# आईबापांचा मित्र.

मोरो गणेश लोंढे.



किंमत ।=॥ आणे.

# प्रस्तावना.



१ मित्राचें काम चांगल्या गोष्टी सांगण्याचें, हिताच्या गोष्टी सांगण्याचें, हें ह्मणजे कोणास ठाऊक नाहीं, असें नाहीं. **'पापान्निवारयति योजयते हिताय,'** हें सुभाषित पुष्कळांच्या कानांवरून गेलें असेल. आईबापांस चार हिताच्या गोष्टी सांगाव्या, असें वाटल्यावरून हा लहानसा लेख लिहिला आहे. तो पूर्ण आहे असें समजावयाचें नाहीं; त्यांत उत्तरोत्तर भर पडावयाची आहे. परंतु अशा संग्रहाचा आरंभ करून ठेवावा, असें वाटल्यावरून हा अल्प प्रयत्न केला आहे. **'हितं मनोहारि च दुर्लभं वचः'** हें वाक्य सर्वांस माहीत आहे. हिताची असून मनोरम गोष्ट सांगणें कठीण आहे. तेव्हां मित्रत्वाच्या नात्यानें चार गोष्टी सांगतांना, कोठें अधिकउणें झाल्यास, त्याबद्दल मातापितरांनीं रागावूं नये.

२ हल्लीं आमची स्थिति फार चमत्कारिक झाली आहे. आमचें हित कशांत आहे, हें आह्मांस समजेनासें झालें आहे. प्रत्येक विषयावर अनेकांचीं अनेक मतें कानांवर येऊं लागल्यामुळें, आह्मी गोंधळून गेलों आहों; त्यांतून सार काढण्याचे आमचे प्रयत्न, अद्याप चांगलेसे तडीस गेले नाहींत. कोणतेंही काम, आह्मांस स्वतांच्या प्रयत्नानें तडीस

---

१ सर्व सुभाषित असें आहे:—

**पापान्निवारयति योजयते हिताय**
**गुह्यानि गूहति गुणान्प्रकटीकरोति ।**
**आपद्गतं च न जहाति ददाति काले**
**सन्मित्रलक्षणमिदं प्रवदन्ति सन्तः ॥**

याचें भाषान्तर **वामन**पंडितांनीं असें केलें आहे:—

**योजी हिताप्रति निवारुनि पापकर्में**
**वर्णी बरेच गुण झांकुनियां कुकर्में ।**
**दे आपणांस असतां, व्यसनीं त्यजीना**
**सन्मित्रलक्षण असें वदतात जाणा ॥**

लावितां येईनासें झालें आहे. एखादें काम तडीस लावण्याचें मनांत आणल्यास, अनेक बाजूंनीं अनेक अडचणी उत्पन्न होतात; त्यांचें निवारण करतां करतां आह्मांस पुरेवाट होते; शेवटीं आह्मी यत्नपराङ्मुख होऊन भेदरून जातों, व आमचें कर्तव्य कोणतें हेंही आह्मांस नीट कळेनासें होतें!

३ आमच्या पूर्वजांचा वर्तनक्रम आह्मीं सोडून दिला आहे, व नवीन मार्गाचें अवलंबन आह्मांस नीटसें साधलें नाहीं. आह्मी नुसते चकित होऊन, रोज नव्या नव्या दिसणाऱ्या अनेक गोष्टींच्या अद्भुत दर्शनानें शिथिल व स्तब्ध होऊन राहिलों आहों, व आश्चर्ययुक्त मुद्रेनें या विचित्र व्यवहाराकडे नुसते पाहात राहिलों आहों, पण अशानें काय होणार! आमचें खरें कर्तव्य कोणतें, तें आह्मीं निवडून काढिलें पाहिजे, व सृष्टींतील अनेकविध घडामोडींत आह्मांस कसें घुसतां येईल, याचा विचार केला पाहिजे.

४ **'पराधीन जिणें व पुस्तकी विद्या'** ही ह्मण आह्मांस बरोबर लागू पडते. आमच्या शिक्षणाचा उपयोग, आह्मांस नोकरीशिवाय कांहीं करितां येत नाहीं किंवा होत नाहीं. परंतु असें होणें चांगलें नाहीं. ही स्थिति आपण आपल्या प्रयत्नानें बदलली पाहिजे. ती कशी बदलावी हा मोठा प्रश्न आहे. तो सोडवावयाचा, ह्मणजे पुढील पिढी कर्तबगार निघण्याकरितां प्रयत्न करावयाचे. तें काम सोपें नाहीं. त्याकरितां आमच्या हल्लींच्या स्थितींत बरेंच परिवर्तन घडवून आणलें पाहिजे. तें काम आईबापांच्या दृढ प्रयत्नांशिवाय व्हावयाचें नाहीं. याकरितां आईबापांस कांहीं हिताच्या गोष्टी सांगाव्या, असें योजिलें आहे. त्यांचा उपयोग आईबापांनीं करून घ्यावा, व त्यांत आपल्या अनुभवाची भर टाकावी.

५ आईबापांचें प्रेम आपल्या संततीवर किती असतें, हें सर्वांस ठाऊक आहे. पण त्या प्रेमाचा मोबदला पुष्कळ आईबापांस संततीकडून मिळत नाहीं, किंवा त्यांस तो मिळालासा तरी वाटत नाहीं; तर असें कां व्हावें? ज्या आईनें मुलास नऊ महिने आपल्या पोटांत वागविलें, तीवर अप्रीति करण्यास त्या मुलानें कां तयार व्हावें? किंवा जो बाप

मुलांच्या कल्याणाचेच विचार अक्षय करीत असतो, तो बाप त्या मुलास नावडता कां व्हावा? केवळ उभयतांच्या गैरसमजामुळें पुष्कळ वेळां असे प्रकार घडतात. आईबापांनीं सौम्यपणाचें वर्तन ठेवल्यास व सारासार विचार केल्यास, असे प्रसंग टाळतां येतील.

६ मुलगा वयांत येऊं लागला, ह्मणजे त्याचें व बापाचें बहुधा विनसावयाचें, असा प्रकार हल्लीं फार आढळतो. आईचें न ऐकणारीं मुलें लहानपणापासूनच दृष्टीस पडतात. मुलगा शिकून तयार झाल्यावर, त्याचें व बापाचें न जमल्यास तो प्रकार वेगळा. कारण उभयतांच्या शिक्षणांत अंतर असल्यामुळें, उभयतांच्या मतभेदाचा तो परिणाम असें ह्मणतां येईल; पण लहानपणीं असें कांहीं कारण नसतां उद्भवणारें द्वैत चांगलें नाहीं. त्यास आळा घालतां येईल तितकें चांगलें.

७ काय करावें मास्तर, मुलगा आमचें ऐकत नाहीं, बिलकूल ऐकत नाहीं; असें ह्मणणारीं आईबापें हल्लीं बरींच आढळतात. आतां हें खरें कीं त्यांतून कित्येकांचें गाऱ्हाणें उगीचही असेल. पण गाऱ्हाणें पुष्कळ वेळां ऐकावयास येतें खरें. हा काय चमत्कार आहे? यक्षिणीनें कांडी फिरवावी त्याप्रमाणें—कांहीं अद्भुत प्रभावानें किंवा **कलियुगा**च्या बळानें—सर्वच मुलें अशीं उत्पन्न झालीं काय? परंतु या कुरकुरींत कांहीं अर्थ नाहीं. **'कांहीं गुण स्वागीचा व कांहीं सोनाराचा!'** तसाच यांतही मुलांच्या बरोबरीनें आईबापांचा दोष असण्याचा संभव आहे. आपल्यांत असा कांहीं दोष असल्यास, तो आईबापांनीं काढून टाकावा, हें योग्य आहे.

८ मुलांस वागविण्यांत, योग्य ती व्यवस्था आईबापांच्या हातून होत नाहीं, यामुळें हे दोष पुष्कळ ठिकाणीं उत्पन्न होत असावे, अशी अटकळ करण्यास जागा आहे. आईबापांनीं योग्य तो प्रयत्न केल्यास असे दोष टाळतां येतील. कित्येक ठिकाणीं मुलांचे स्वभाव वाईट असतील, पण सर्वच ठिकाणीं मुलांचे स्वभाव वाईट, असें ह्मणतां येणार नाहीं. ह्मातारीं मनुष्यें सर्व दोष **कलियुगा**वर ढकलून मोकळीं होतात; किंवा दैववादी बनून—होणार तें चुकावयाचें नाहीं—अशी मनाची समजूत करून घेतात, पण हें बरोबर नाहीं. ज्यांचीं मनें शिक्षणानें विकास

पावलीं आहेत, ते असें ह्मणणार नाहींत, पण अद्याप आपल्याकडे अशा लोकांची संख्या फार थोडी आहे.

९ **कलियुग** बिचारें काय करणार? तें का सजीव आहे! त्यांत जीव घालण्याचें किंवा त्यांतील जीव—तें सजीव असल्यास–काढून घेण्याचें आपल्या स्वाधीन आहे. आपण प्रयत्न केले तर **कलियुगाला सत्ययुग** बनवूं! आमच्या लोकांनीं सोन्याच्या लगडी व रत्नांच्या राशी आपल्या घरांत खचून भरून ठेविल्या होत्या—व अद्यापही कोठें कोठें असतील, त्यांनीं आमचें काय हित केलें? नुसत्या नेत्रेंद्रियास तृप्त करण्याखेरीज त्यांच्यांत काय सामर्थ्य आहे? त्या पार कोणीकडल्या कोणीकडे निघून गेल्या! **हिंदुस्तानाला**—सोन्याचा किनारा—ह्मणून भूषविणारे लोकच हल्लीं त्याला—दरिद्री लोकांचा देश—असें ह्मणूं लागले आहेत. एखादा दुष्काळाचा हल्ला देशावर आला, ह्मणजे आमच्या तोंडचें पाणी पळून जातें! मागें आमच्या देशांत अनेक **दामाजी** उत्पन्न होऊन, दुष्काळाशीं तोंड देऊन, गरीबगुरिबांचे प्राण वांचवीत असत. हल्लीं गरीबगुरिबांचें रक्षण सरकारी मदतीशिवाय आमच्यानें होत नाहीं. अनाथ लोकांचे कळप मिशनरींच्या गोटांकडे धावूं लागले, तरी त्यांस मदत करण्याचें सामर्थ्य आमच्यांत नाहीं. आमचें स्वतांचें रक्षण कसें होईल, या काळजीनें जर आमचा ऊर दडपून जातो, तर इतर लोकांच्या सुख-दुःखाचा विचार आमच्या मनांत कोठून शिरणार!

१० **इंग्लंड** देशाकडे लक्ष दिल्यास निराळाच प्रकार दृष्टीस पडतो. ज्या वेळेस आमचा देश वैभवाच्या शिखरावर वसला होता, त्या वेळेस **इंग्लंड** देश केवळ दरिद्री होता. पण त्या देशांतील लोकांच्या दीर्घ प्रयत्नानें, तो आज लक्ष्मीचें माहेरघर बनला आहे. त्यांनीं आपल्या कोळशांच्या खाणींपासून—उद्योगरूपी किमयाच्या मदतीनें—सोन्याच्या व रत्नांच्या खाणी उत्पन्न केल्या आहेत. या सर्वांस कारण त्यांच्यांतलीं कल्पक माणसें व त्यांचे दीर्घ प्रयत्न.

११ त्याप्रमाणें आपण ही दीर्घ प्रयत्न केल्यास, आमच्यांत कल्पक माणसें उत्पन्न होतील. **'हिंमत मर्दा तो मदत खुदा'** ही ह्मण आपण लक्षांत ठेविली पाहिजे. सांठविलेली संपत्ति किती दिवस पुरणार! ती

नवी नवी उत्पन्न करणारीं माणसें तयार झालीं पाहिजेत. त्यांनीं भौतिक शास्त्रांचें ज्ञान संपादन करून, त्यांच्या द्वारें संपत्तीचे नवे व जिवंत झरे उत्पन्न केले पाहिजेत. या गोष्टीला **कलियुग** आह्मांला आडवें येणार नाहीं. मात्र सतत प्रयत्नावर आमचा दृढ भरंवसा पाहिजे. उदासीनपणा—**कलियुगा**चा जप—मात्र आपण अगदीं टाकून दिला पाहिजे. वेळ येईल तेव्हां होईल असें न ह्मणतां, दृढ व संतत प्रयत्नानें, ती वेळ आणतां येईल तितकी लौकर आणली पाहिजे.

१२ संतति सर्वांसच नसते. तरी ती ज्यांस लाभली असेल, त्यांनीं ती पुढें चांगली निपजावी, करती सवरती निपजावी, तिचें नांव जगांत चिरकाल राहील अशी ती असावी, ती **'पाप्यांचीं पितरें'** या संज्ञेस पात्र होणारी नसावी, अशाबद्दल योग्य प्रयत्न करावे, हें योग्य आहे. तसेंच संततीपासून होईल तेवढा सुखाचा लाभ त्यांनीं करून घ्यावा, आणि संततीचें खरें हित कशांत आहे, व ते आपल्यास कसें साधितां येईल, याचा विचार करावा; केवळ अविचारानें किंवा वृथाभिमानानें आपल्या वर्तनांत कांहीं दोष होत असल्यास ते टाळावे; आपल्या प्रेमास—वेडाचें रूप न देतां—विचाराचें रूप द्यावें, व आपल्या संततीस चांगले आईबाप बनविण्याचा प्रयत्न करावा, हेंही त्यांचें कर्तव्य आहे.

१३ हें त्यांचें कर्तव्य त्यांस चांगल्या रीतीनें बजावतां यावें, त्यांच्या मनांत असलेलें संततिविषयक प्रेम दुणावावें, त्यांची इच्छा, कळकळ, हीं योग्य उपयोगाचीं व मुलांच्या व त्यांच्या हिताचीं व्हावीं, याकरितां त्यांस कांही गोष्टी सांगण्याचें योजिलें आहे. त्या त्यांस माहीत आहेतच. परंतु वेळेवर त्यांचा उपयोग व्हावा, ह्मणून एकत्र लिहून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. तो त्यांनीं मान्य करून घ्यावा, व त्याचा होईल तेवढा उपयोग करावा, अशी त्यांस प्रार्थना आहे.

तारिख ३१ अगष्ट १९११. } **मोरो गणेश लोंढे.**

# अनुक्रमणिका.



---

# शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | १ | आईबापाचा | आईबापांचा |
| ६ | ५ | उपयोगी | उपयोगीं |
| २१ | २० | ८ | ७ |
| २८ | १ | आईबापाचा | आईबापांचा |
| ३० | २९ | नको–पाहिजे. | हीं अक्षरें नकोत. |
| ३२ | २८ | कर्में | कर्मैं |
| ५४ | २९ | रकावयाचें | करावयाचें |
| ७८ | १५ | हि प्रेप्य | हि प्रेष्य |
| ८७ | २९ | वषापुढें | वर्षांपुढें |
| ८८ | २ | वर्षें | वर्षैं |
| ९५ | २१ | हे | हें |
| ९५ | २२ | व्या | च्या |

# आईबापांचा मित्र.



## भाग पहिलाः—आपली सुधारणा.

१ **'बाप तसा बेटा व कुंभार तसा लोटा', 'आई तशी बेटी व खाण तशी माती'**, ह्या ह्मणी आपल्याच भाषेंतल्या आहेत. यांत पुष्कळ तथ्य आहे. कुंभार जसा आकार लोट्याला देईल, तसा तो होईल. त्यानें लोट्याचा कांठ थापटल्यास, लोटा बिचारा काय करील ! आईबाप हे मुलांस शिक्षण देणारे आहेत. ते मुलांस जसें शिक्षण देतील, तशीं तीं तयार होतील. त्यांनीं शिक्षणाची हयगय केल्यास मुलांवर वाईट परिणाम होईल, पण त्यास मुलांनीं काय करावें? हें शिक्षण ह्मणजे 'श्री श्री श्री श्री' करून द्याव-याचें नव्हे, तर आपल्या अनुकरणाचें ! लहान मुलांकडे लक्षपूर्वक पाहिल्यास असें आढळून येईल कीं, त्यांच्या डोळयांपुढें ज्या गोष्टी घडत असतात, त्यांचें तीं अनुकरण करीत असतात. त्यांनीं शिमग्यांतली राधा पाहिल्यास, तीं हात वर करून गिरक्या मारतांना दिसतात; कथा पाहिल्यास, बोआप्रमाणें आ, ई, करून—साधल्यास गळयांत माळ घालून–हातांत तंबुरीच्या बदला काठी घेऊन,–बोआची हुबे-हुब नक्कल करण्यांत गुंतलेलीं दिसतात; नाटक पाहिल्यास, सोंगें घेऊन पात्रांच्या हावभावांचें व भाषणांचें प्रतिबिंब उठवतांना दिस-तात; घोड्यांची सरकस पाहिल्यास, कांहीं मुलें घोडे होऊन नाच-तांना, कांहीं **बॅन्ड**ची नक्कल तोंडानेंच करितांना किंवा वाद्यें वाज-वितांना दिसतात–व एखादा **प्रोफेसर** बनून चाबूक फडकावतांना दिसतो;–एकंदरींत तीं अनुकरणप्रिय असतात.

२ आईबापांचा–त्यांतही आईचा–मुलांशीं निकट संबंध अस-ल्यामुळें तीं आईबापांचें–विशेषतः आईचें–पुष्कळ अंशीं अनुकरण

करितात. तीं उठतात कशीं, बसतात कशीं, करतात काय, त्यांस चांगलें काय वाटतें, वाईट काय वाटतें, याकडे त्यांचें एकसारखें लक्ष असतें. आईबापांनीं न शिकवितां तीं त्यांचे गुणदोष घेत असतात, त्यांचा वर्तनक्रम पाहून तीं आपला वर्तनक्रम ठरवीत असतात, यामुळें **'खाण तशी माती'** या ह्मणीची सत्यता जगास आपोआप येत असते.

३ इतकें मनांत आणल्यावर आईबाप बनणारांनीं कसें वागावें, आपल्यांत कांहीं कमतरपणा असल्यास तो नाहींसा करण्याकरितां आधीं प्रयत्न कां करावे, संततीवर ताबा चालवण्यापूर्वीं आपल्या मनावर ताबा चालवण्यास कां शिकावें, या गोष्टी सहज लक्षांत येतील.

४ मुलास कित्ता वाईट दिल्यास त्याचें अक्षर चांगलें होईल, ही आशाच करावयास नको. एखादें नियमित वळण त्यास लागावें, अशी आपली इच्छा असल्यास, त्यास तसल्या वळणाचाच कित्ता दिला पाहिजे, हें कोणीही कबूल करील. इतर गोष्टींसही हाच नियम लागू आहे. मग बाह्य सृष्टीपासून व समाजापासून मनुष्यास होणारे सर्व लाभ त्यास प्राप्त व्हावे; त्यानें आपल्या कुटुंबाचें योग्य प्रकारें पालन करून, समाजाच्या व देशाच्या कल्याणास तयार व्हावें; जगांत नांव मिळवून आपल्या जन्माचें सार्थक करावें; अशी आपली इच्छा असल्यास त्या मुलापुढें जो कित्ता (जें उदाहरण) आपल्यास ठेवावयाचा, तो किती वळणशुद्ध असला पाहिजे, हें काय सांगावें! तो जितका उत्तम असेल तितका चांगलाच!

५ असा कित्ता मिळवावयाचा तरी कोठें! तो शोधण्यास लांब जाऊन चालावयाचें नाहीं, तो घरांतल्या घरांतच तयार केला पाहिजे. कारण मुलांस सर्व वेळ आईबापांची संगति असते. याकरितां मुलें आईबापांचा कित्त्यासारखा उपयोग करीत असतात. आईबाप हे मुलांस कित्त्यासारखे उपयोगीं पडणारे आहेत, त्यांचें वळण मुलांच्या नजरेस एकसारखें पडावयाचें आहे व तेंच मुलांच्या वर्तनांत प्रतिबिंबित व्हावयाचें आहे; याकरितां आपल्या

मुलांचें कल्याण व्हावें, अशी ज्या आईबापांची इच्छा असेल, त्यांनीं प्रथम आपण चांगल्या कित्त्याप्रमाणें होण्याचा साधेल तेवढा प्रयत्न करावा, म्हणजे आपलें वर्तन चांगलें ठेवण्याचा प्रयत्न करावा.

६ आईबाप होण्यापूर्वी कदाचित् त्यांच्यांत एखादा दुर्गुण असला, त्यांस एखादी वाईट संवय असली, तरी आपल्या संततीस तो दुर्गुण लागूं नये किंवा ती संवय बाधूं नये, म्हणून तो दुर्गुण व ती वाईट संवय संतति झाल्यावर, त्यांनीं सोडून दिली पाहिजे. नाहींतर त्यांच्या संततीस बहुतकरून वाईट वळण लागेल. संततीवरून लोक त्यांची परीक्षा करतील, व त्याचा परिणाम त्यांस व त्यांच्या संततीस सारखाच बाधक होईल!

७ **'बापसे बेटा सवाई'** अशी संतति होण्याचें एकीकडे राहून, दिवसेंदिवस हरभऱ्याच्या झाडावर चढण्यास शिडी लावावी लागण्यासारखी,—किंवा मोठ्याशा वाऱ्यानें सहज उडून जाणारी—संतति कोठें कोठें दृष्टीस पडते, याचें तरी कारण हेंच आहे. संततीस आईबापांचें वर्तन कित्त्यासारखें उपयोगीं पडतें, त्याप्रमाणेंच संततीस आईबापांची शरीरसंपत्ति घरच्या भांडवलासारखी उपयोगीं पडते. घरचें भांडवल असलें म्हणजे व्यापारांत पुष्कळ नफा होतो, व्याज देण्याचा तगादा मागें नसतो, केवळ दराच्या चढउतारानें दिवाळें वाजण्याचा प्रसंग येत नाहीं; त्याप्रमाणेंच वडिलार्जित शरीरसंपत्ति चांगली असल्यास संततीस ती आपल्या प्रयत्नानें वाढवितां येते, किंवा कायम ठेवून पुढील संततीस भांडवलादाखल देतां येते, व आपल्या आयुष्यात असलेल्या सुखाचा अनुभव घेतां येतो. परंतु वडिलापासून तिचा लाभ घडला नसल्यास, ह्या वर सांगितलेल्या गोष्टी नीट करतां येत नाहींत. प्लेगसारख्या सांथीच्या रोगाशीं किंवा परिस्थितीशीं झगडतांना टिकाव लागण्याचें कठीण पडतें, व केव्हां केव्हां दुसऱ्याचें भांडवल आणून व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्याप्रमाणें संततीचें दिवाळें निघण्याचाही प्रसंग येतो! अशक्त व दुर्बळ आईबापांची संतति सशक्त व सबळ कशी

निपजेल? रोगी व दुखणेकरी आईबापांची संतति निरोगी कशी उत्पन्न होईल ? **'आडांत असेल तर पोहऱ्यांत येईल'** त्याप्रमाणेंच जें तेज बापांतच नाहीं, तें लेंकांत तरी कोठून उत्पन्न होईल? याला अपवाद आढळणार नाहीं, असें नाहीं, पण साधारणपणें ह्या गोष्टी खऱ्या आहेत. कोणत्याही गोष्टीला केवळ एकच कारण पुरेसें नसतें, त्याला दुसरीं अनेक कारणें असतात, त्याप्रमाणें येथेंही आहे. कांहीं असलें तरी **'उद्धरेदात्मनात्मानं'**[1] हें **गीता**वाक्य आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. आपली योग्य सुधारणा व्हावी, शरीरबळ वाढावें, आपल्यास सद्गुण प्राप्त व्हावे, अशी आपली इच्छा असल्यास, त्याकरितां आपण जिवापाड श्रम केले पाहिजेत. कारण त्यापासून आपला फायदा होऊन आपल्या संततीचाही फायदा होणार आहे. जे गुण आपल्यांत असतील, तेच गुण आपल्या संततींत अधिक परिणतावस्थेस पोंचण्याचा पुष्कळ संभव असतो, व सद्गुणांच्या मानानें जीवितयात्रा अधिक सुखकारक होते; याकरितां आईबापांनीं आपली सुधारणा करण्याकरितां काय करावें, याचा विचार करूं.

## १ आईबापांनीं इंद्रियनिग्रह करावयास शिकावें.

१ इंद्रियनिग्रह करावयास शिकणें हा या सुधारणेचा पाया आहे. आपल्या मनास आळा घालतां आल्याशिवाय, कोणताही सद्गुण ग्रहण करितां येणार नाहीं किंवा दुर्गुण टाकतां येणार नाहीं.

---

[1] सर्व श्लोक असा आहे:—

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥

याचें भाषांतर **वामन** पंडितांनीं असें केलें आहे:—

**उद्धरावें स्वचित्ताला प्रपंचीं बुडवूं नये ।
मित्र हें आपुलें चित्त शत्रूही चित्त आपुलें ॥**

**भ. गी.** अ. ६ श्लो. ५

इंद्रियनिग्रहाशिवाय आपली शरीरसंपत्ति सुदृढ राहावयाची नाहीं, व ती सुदृढ असल्याशिवाय चांगली संतति आपल्या दृष्टीस पडावयाची नाहीं. चांगल्या संततीपासून लाभणारें अद्वितीय सुख पाहिजे असेल; मुलें चेंडूसारखीं तेजस्वी, चपळ हवीं असतील; तर आपण विषयसुखाचें सेवन माफक केलें पाहिजे. एक सुख सोडावें तेव्हां दुसरें सुख आपल्यास मिळेल. इंद्रियनिग्रह हें सर्व सुखाचें साधन आहे. **मनु** म्हणतो:—

**इंद्रियाणां प्रसंगेन दोषमृच्छत्यसंशयम् ।**
**सन्नियम्य तु तान्येव ततः सिद्धिं नियच्छति ॥**

**मनु**—अ. २ श्लोक ९३

"इंद्रियें विषयांच्या ठायीं आसक्त झाल्यानें जीवास दोष प्राप्त होतो, व त्याच इंद्रियांचें नियमन केल्यानें त्यापासून जीव सिद्धि पावतो. याकरितां इंद्रियांचें नियमन करावें."

२ नानाप्रकारचीं व्रतें आचरण करावयास सांगण्यांत धर्मग्रंथ लिहिणारांचा हेतु, इंद्रियनिग्रह साधावा, हाच आहे. ब्रह्मचर्याचा काल वाढवावा, साधल्यास आजन्म ब्रह्मचर्य पाळावें, असें सांगण्यांत इंद्रियनिग्रह साध्य व्हावा, हाच हेतु आहे. ऋतुकालीं स्त्रीशीं गमन करावें, हें सांगण्यांत हाच प्रधान हेतु आहे. **मनु** म्हणतो:—

**ऋतुकालाभिगामी स्यात्स्वदारनिरतः सदा ।**
**पर्ववर्जं व्रजेच्चैनां तद्व्रतो रतिकाम्यया ॥**

**मनु**—अ. ३ श्लोक ४५

"स्त्रीचे ठायीं ऋतुकालीं पर्वदिवस ( अमावास्या, अष्टमी, पौर्णमासी, चतुर्दशी, आणि सूर्यसंक्रांति ) वर्ज्य करून गमन करावें. सर्वदा आपल्या स्त्रीच्या ठायीं निरत असावें. भार्याप्रीति संपादनरूप व्रत धारण करणारानें संभोगाच्या इच्छेनें पर्वदिवस वर्ज्य करून स्त्रीगमन करावें."

३ या एका श्लोकाचा नीट विचार केल्यास गृहस्थांस पुष्कळ फायदा होण्यासारखा आहे. स्त्रियांनीं पतिव्रताधर्मानें वागावें,

असें पुरुषांस वाटतें; पण पुरुषांस कांहीं व्रत आहे, अशी त्यांची कल्पना नसते. परस्त्री वर्ज्य करावी, असें वेगळें सांगण्याचें कारण या श्लोकानें उरत नाहीं. स्वस्त्री झाली तरी ही ऋतुकालाशिवाय गमन मनांत आणतां उपयोगी नाहीं, व पर्वदिवस आणखी वर्ज्य आहेतच. या सर्वांचा मुद्दा पुरुषानें केवळ स्त्रैण बनूं नये, आपल्या वीर्यास नीट जपावें, इंद्रियनिग्रही व्हावें, व त्याच्या योगानें सशक्त राहून सर्व पुरुषार्थ साधणारें व्हावें, हाच आहे. आईबापांनीं हा श्लोक सर्वकाळ आपल्या अंतःकरणांत बाळगण्यासारखा आहे.

४ **मनूनें** म्हटलें आहेः—

**[1]न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥**

**मनु**—अ. २ श्लोक ९४

काम उपभोगानें कमी होत नाहीं, वाढतो. याकरितां कामाच्या स्वाधीन होणें चांगलें नाहीं. फुलांचा उपभोग घेऊं लागल्यास फळांचा लाभ होणार नाहीं, त्याप्रमाणें कामासक्ति वाढल्यास चांगली संतति लाभणार नाहीं. संतति चांगली व बेताची असल्यास ती अधिक सुखास कारण होते. संतति रोगी व पुष्कळ असल्यास तिचें रक्षण करण्याचें कठीण पडतें, व तिच्यापासून आपणांस सुखाचा लाभ व्हावा तेवढा होत नाहीं, याकरितां इंद्रियनिग्रह अवश्य करावा. पूर्वींच्या ग्रंथांत चांगल्या संततीची इच्छा करणाऱ्या आईबापांनीं तपश्चर्या केल्याच्या अनेक कथा आढळतात, त्यांचें तात्पर्य हेंच आहे. इंद्रियनिग्रहाशिवाय तपश्चर्या होत नाहीं, व इंद्रियनिग्रह चांगली संतति होण्याचें प्रधान कारण आहे, याकरितां चांगली संतति इच्छिणारांनीं इंद्रियनिग्रह अवश्य करावा.

५ इंद्रियनिग्रही **भीष्म** केवढा पराक्रमी होता, किती दीर्घायुषी

---

१ कामाच्या (विषयांच्या) उपभोगानें काम (इच्छा—विषयसुखाची इच्छा) कधींही निवृत्त होत नाहीं, तर घृतानें जसा अग्नि प्रदीप्त होतो, तद्वत् (विषयसेवनानें) काम पुनः वृद्धिंगत होतो.

होता, या गोष्टी **महाभारतांत** प्रसिद्ध आहेत. त्याच्याच वंशांत पुढें **विचित्रवीर्य** झाला. त्याला **भीष्मानें** दोन स्त्रिया करून दिल्या. त्या दोघीही सुरूप आणि सद्गुणी होत्या, पण **विचित्रवीर्य** केवळ स्त्रैण बनल्यामुळें रोगग्रस्त होऊन केवळ अल्पवयांत प्राणास मुकला. हीही कथा **भारतांत** प्रसिद्ध आहे. **विचित्रवीर्या**सारखा राजा,–ज्याला सर्व साधनें अनुकूळ,–त्याची सुद्धां कामासक्तीनें राखरांगोळी झाली, मग साधारण मनुष्याची कथा काय! या दोन्ही उदाहरणांकडे लक्ष देऊन आईबापांनीं **भीष्मा**प्रमाणें इंद्रियनिग्रही व्हावें व **विचित्रवीर्या**प्रमाणें कामासक्त बनूं नये.

## २ खोटी श्रीमंती किंवा पोकळ डामडौल यांस भुलूं नये.

१ श्रीमंती ही प्रत्येकाला हवी आहे, पण ती फार थोड्यांस अनुकूळ असते. श्रीमंती नसतां ती दाखविण्याचा नाद पुष्कळांस असतो. तो चांगला नाहीं. त्यामुळें फार नुकसान होतें. मी सरदार माझ्याजवळ गाडीघोडा असावा; मी इनामदार मजजवळ चाकरमाणसें असावीं; मी श्रीमंत माझ्या बायकोच्या किंवा मुलांच्या आंगावर चार डागिनेडुगिने असावे; ह्या इच्छा वाईट आहेत, असें म्हणतां यावयाचें नाहीं. पण सामर्थ्य नसल्यास केवळ दाखविण्याकरितां–किंवा बरें दिसण्याकरितां–ह्या गोष्टी करणें चांगलें नाहीं. कारण केव्हां केव्हां या उपरी खर्चानें बेजार होऊन जरूरीच्या गोष्टींकडे दुर्लक्ष करण्याची पाळी येते. केवळ रूढि किंवा वाडवडिलांची रीत म्हणून नकली डामडौल करणें चांगलें नाहीं. प्रथम आपला चरितार्थ चांगल्या रीतीनें चालला पाहिजे. [illegible]ापिण्याचे हाल करून डागिने आंगावर घालणें चांगलें नाहीं. डागिन्यांत घातलेला पैसा गुंतून राहतो, व केव्हां केव्हां प्रसंग पडला तरी ते मोडण्याचें जिवावर येतें. गाड्याघोडीं बाळगून दिवसेंदिवस कर्जाचे बोजे आंगावर चढवण्यांत काय पुरुषार्थ आहे? संततीवर कर्जाचे बोजे लादण्यापेक्षा 'रिकामें वैभव' असलें कमी झालें म्हणून कांहीं हरकत नाहीं. गाडीघोड्याचा खर्च झेपत नसेल तर थोडें बहुत पायांनीं चालण्यास हरकत नाहीं. गडी ठेवण्याचें

सामर्थ्य नसेल तर आपलें घरचें काम आपण करण्यांत हलकेपणा नाहीं. ऋतुमानाप्रमाणें लत्ता कपडा न वापरतां एखादा डागिना आंगावर घातला, तर त्यापासून आरोग्याचें रक्षण होणार नाहीं. साध्या रीतीनें वागणें जेवढें साधेल तेवढें चांगलें. त्यापासून श्रीमंतासही मोठेपणाच येतो, मग गरिबास हलकेपणा कसा येईल? प्रसंगीं दोन पैसे जवळ असल्यास त्यांचा जेवढा उपयोग होईल, तेवढा डागडागिन्यांचा उपयोग होणार नाहीं. कारण **'आप करेसो काम व पदरीं असे सो दाम'** आपण केलें असतां जसें काम होईल, तसें दुसऱ्यावर सोंपवून होणार नाहीं. त्याप्रमाणेंच जवळ असलेला पैसा जसा उपयोगीं पडेल, तसा डागडागिना उपयोगीं पडणार नाहीं. अधिक पैसा असल्यास त्यांतला थोडा बहुत डागिन्यांत घालण्यास हरकत नाहीं, पण सर्व पैसा डागिन्यांत कधींच गुंतवूं नये. डागिन्यांतील पैसा केव्हांही वाढावयाचा नाहीं, उलट तो कमी मात्र होतो. याकरितां कांहीं पैसा जवळ असणें किंवा चांगल्या पेढीवर ठेवणें अधिक चांगलें. गरिबगुरिबांससुद्धां कांहीं पैसा संग्रहीं ठेवितां यावा, म्हणून सरकारानें **सेव्हिंग ब्यांकेचें** काम पोष्टाकडे दिलें आहे, त्याचा उपयोग त्यांनीं अवश्य करून घ्यावा.

२ लोक आपल्यास गरीब म्हणतील, या धास्तीनें श्रीमंती दाखविण्याचा प्रयत्न—सामर्थ्य नसतां—कित्येक करीत असतात, तें चांगलें नाहीं. कारण यापासून ते अधिक दरिद्री होतात व आपल्यावर रिकामीं संकटें ओढून आणतात. आपण गरीब असल्यास आपल्यास लोकांनीं गरीब म्हटलें म्हणून बिघडलें काय? उलट आपण गरीब आहों, हें समजून आपण वागल्यास आपल्यावर संकट कधींच येणार नाहीं. **'हांतरूण पाहून पाय पसरावे'** अशी म्हण आहे. त्याप्रमाणें आपण आपला आदा पाहून खर्च करूं लागूं व त्यापासून आपली स्थिति निश्चयानें सुधारेल, पण आपण आपल्या स्थितीकडे दुर्लक्ष केल्यास, आपण अधिकाधिक कर्जबाजारी बनूं व अधिकाधिक हीनावस्थेस जाऊन पोहोंचूं. खरोखर आपली हीनावस्था असल्यास, ती तशी नाहीं असें मानणें, किंवा

ती कालमानानें झाली आहे म्हणून तिच्याकडे दुर्लक्ष करणें, चांगलें नाहीं. तिच्या विचारानें आपण आपल्यास खिन्न करून घेऊं नये, पण तिच्या प्रतिकाराचे प्रयत्न आपण एकसारखें करीत राहिलें पाहिजे. ती झांकून ठेवूं नये, एखाद्या रोगाप्रमाणें उघडी ठेवावी, म्हणजे ती नाहींशी करण्याचे उपाय आपल्यास दिसूं लागतील; किंवा शहाणे लोक योग्य उपाय आपल्यास दाखवतील. पुष्कळांस आपली खालावलेली स्थिति किंवा असलेली गरीबी, लोकांच्या लक्षांत येऊं नये असें वाटतें, पण तें बरोबर नाहीं. त्यामुळें त्यांचें व त्यांच्या संततीचेंही वारंवार नुकसान होतें; याकरितां आईबापांनीं या खोट्या श्रीमंतीस आपल्या मनांत बिलकूल थारा देऊं नये.

## ३ रिकामीं भांडणें टाळावीं.

१ हल्लींचा काळ स्वस्थतेचा आहे. म्हणजे हल्लीं लढाईचे प्रसंग फारसे येत नाहींत, दंगेधोपे अगदीं कमी आहेत, याचा फायदा घेऊन प्रत्येकानें आपली स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करावा. पण आमच्या लोकांची स्थिति चमत्कारिक दिसते, म्हणजे त्यांच्यांत रिकामीं भांडणें मात्र उदयास आलेलीं दिसतात.

२ एखाद्या जमिनीच्या लहानशा तुकड्याकरितां भाऊ भाऊ एकमेकांशीं भांडून भिकारी होतात, पण त्यांचा तंटा सलोख्यानें आपसांत मिटत नाहीं. सावकार व कुळें, व्यापारी व गिऱ्हाईक, जमीनदार व जमिनी करणारे, सरकारी कामदार आणि रयत, यांचा नित्यसंबंध असतां, ते एकमेकांच्या हिताकडे पाहात नाहींत; जो तो दुसऱ्यास बुडवून आपली पोतडी भरावयास पाहातो; पण ज्यानें त्यानें दुसऱ्यास नागवण्याचा विचार केल्यास प्रत्येक जण नागवला जाईल, याची कल्पना कोणाच्याच मनांत येत नाहीं; असें कित्येक वेळ आढळतें. जातीजातींतही नवे नवे तंटे नित्य उद्भवत असतात, हें चांगलें नाहीं.

३ हिंदुस्थानदेश चित्रपटासारखा आहे. त्यांत अनेक जातींच्या व अनेक धर्मांच्या लोकांची वस्ती आहे. त्यांनीं एवढ्यातेवढ्या

गोष्टीकरितां एकमेकांशीं भांडत बसावें हें विहित नाहीं. त्यांस एकमेकांशेजारीं नांदावयाचें आहे, मग त्यांनीं एकमेकांशीं वर्दळीस येणें चांगलें कसें ह्मणतां येईल! त्यांनीं आपल्या मनांत विचार केल्यास व एकमेकांबद्दल सहानुभूति बाळगल्यास, रिकामीं भांडणें पुष्कळ नाहींशीं होतील. परंतु हा गुण आपल्या संततींत अधिक परिणतावस्थेस यावा, ह्मणून त्याची लागवड आईबापांनीं आपल्या अंतःकरणांत अवश्य करावी, व रिकाम्या भांडणांचें निर्मूलन करावें.

## ४ श्रमविमुखता टाकून द्यावी.

१ व्यापारी घ्या, शेतकरी घ्या, किंवा नोकर घ्या, सर्व समाजांत श्रमविमुखता पसरलेली दिसते. यामुळें प्रत्येकाचा धंदा त्यास कि[illegible]तीचा वाटेनासा झाला आहे. मोठमोठीं जोखिमांचीं कामें, [illegible] वर घेऊन तडीस लावण्याचें काम, आमच्यानें या गुणाच्या [illegible] होत नाहीं व्यापारी गादीवर बसून हुकूम फरमावूं [illegible] ह्मणून जिन्नस देण्यास, जाग्यावरून उठण्यास किंवा प्रसंगीं [illegible]ण्यास, जर तो लाजूं लागला, तर त्याचा धंदा त्यास [illegible]चा कसा होईल? शेतकरी वेळच्यावेळीं उन्हातान्हांत [illegible] जर कंटाळूं लागला, तर त्याचें शेत त्यास फलद्रूप कसें [illegible]कर त्याच्यावर सोंपवलेलें काम जर वेळच्या वेळीं बरोबर [illegible] झाला, तर त्याची नोकरी त्याच्या धन्यास पसंत कशी पडे[illegible] मग अर्थातच त्यास तरी ती फलद्रूप कशी होईल? बरें या[illegible] समाजाची स्थिति झाल्यावर, असल्या समाजानें एकजुटी[illegible] एखादें काम तडीस लावणें कितीसें शक्य होईल? याकरितां [illegible] श्रमविमुखतेचा दुर्गुण प्रथम टाळला पाहिजे. आपल्या स्वतांच्या कामास जशी त्यापासून अडचण उत्पन्न होईल, तशीच किंवा त्या[illegible]क्षां जास्त परोपकाराचीं कामें करतांना या दुर्गुणाची आपणांस अडचण उत्पन्न होईल. याकरितां आईबापांनीं हा दुर्गुण आपल्यात न शिरावा ह्मणून प्रयत्न करावा. केवळ पोटाकरितां श्रम केले ह्मणजे झालें, अशी समजूत केव्हांही नसावी.

२ अद्याप आमच्यांत सुशिक्षित लोक फारसे नाहींत. तरी सरकारी नोकर साधारणपणें सुशिक्षित असतात, पण त्यांचें वर्तन अद्याप चमत्कारिकच आढळतें. कसें तें पहाः—जो तो सरकारी नोकरींत चूर ! त्यांचे साहेब, ते व त्यांचें खातें, या बाहेर जग आहे, ही कल्पनाच त्यांच्या मनास शिवत नाहींसें दिसतें ! दहा वाजतां कचेरींत जावें, संध्याकाळीं कचेरींतून सुटल्यावर चार पावलें फिरावयास जावें, व मग बिऱ्हाडीं यावें. रात्रीं कामाचें पुडकें बरोबर आणिलें असल्यास खरडेघाशी करावी, नाहींतर काम नसल्यास स्वस्थ घोरत पडावें. चार मंडळी जमल्यास घशी, कोट, करण्यांत किंवा म्यारेज, रायल म्यारेज, उडवण्यांत वेळ घालवावा. आमची सगळी सुधारणा, आमचें सगळें स्वातंत्र्य या असल्या वागणुकींत एकत्र झालें आहे ! आमच्या वागणुकींत काय चूक होत आहे, त्याचा संततीवर काय परिणाम होत आहे, इकडे आमचें लक्ष जात नाहीं. सरकारी नोकरी इमानें इतबारें करणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. पण श्रमविमुख बनणें किंवा वेळाचा अपव्यय करणें चांगलें नाहीं. यापासून भलतेंच वळण संततीस लागण्याचा संभव असतो, तोच वेळ कांहीं ज्ञान संपादनाच्या कामांत किंवा परोपकारांत दवडण्याची संवय लागल्यास हितावह होईल.

३ कितीही चांगले सरकारी नोकर झाले, त्यांनीं आपलीं कामें इमानें इतबारें केलीं, सरकाराकडून किताब मिळविले, संततीकरितां द्रव्याच्या राशी गोळा केल्या, तरी तेवढ्यानें त्यांस **'चांगले आईबाप'** असें ह्मणतां येणार नाहीं. त्यांनीं आपल्या संततीच्या जोपासनेकरितां योग्य ते परिश्रम केल्याशिवाय त्यांस तो किताब मिळणार नाहीं. वाऱ्याबरोबर उडून जाणारी, सांठविलेल्या द्रव्याचा योग्य व्यय न करणारी, किंवा पोषणाकरितां दुसऱ्यावर अवलंबून राहणारी, कशीतरी संतति आपल्यामागें ठेवण्यांत पुरुषार्थ नाहीं.

४ जी गोष्ट सरकारी नोकरांविषयीं सांगितली, तीच इतर लोकांसही लागू आहे. आपल्या संततीचें, समाजाचें व देशाचें, कल्याण व्हावें, असें ज्या आईबापांच्या मनास वाटत असेल,

त्यांनीं या गोष्टी लक्षांत ठेवाव्या व समाजांतील श्रमविमुखता दूर व्हावी ह्मणून प्रयत्न करावा. वरिष्ठ वर्गाची वागणूक पाहून कनिष्ठ वर्ग वागत असतात. वरिष्ठ वर्गांत श्रमविमुखता पसरली, म्हणजे श्रमविमुखता हेंच सुख अशी भावना कनिष्ठ वर्गाचीही होऊं लागते, व यामुळें जो तो श्रमविमुख बनूं लागतो. याचा प्रत्यय पदोपदीं लोकांस हल्लीं येऊं लागला आहे. आपलें काम नेटानें करणारीं माणसें हल्लीं कमी आढळतात. कामावर मजूर घेतल्यास तो चुकवाचुकव करतांना दृष्टीस पडतो. आपल्या कामाला वाहिलेले लोक फार कमी दिसतात. पावसाळा जवळ आला म्हणजे शेतांत जाणारे, व कशीबशी शेताची लागवड करणारे शेतकरी पुष्कळ आढळतात. जमिनीची मशागत चांगली करून, थोडीच जमीन पण ती व्यवस्थित लावणारे शेतकरी, कमी होत चालले आहेत. कोणताही धंदा विशेष लक्ष लावून व विशेष परिश्रम करून केल्याशिवाय, फलद्रूप होणें शक्य नाहीं. याकरितां आईबापांनीं आपल्यांतली श्रमविमुखता दूर सारण्याचा प्रयत्न करावा.

## ५ शरीरसंपत्तीची काळजी घ्यावी.

१ निर्वाहाचा उद्योग कोणताही असो. तो करतांना आपली प्रकृति नीट राखण्याचा व साधेल तर ती अधिक सुदृढ करण्याचा प्रयत्न करावा. सर्व पराक्रमाचें मूळ व आत्म्याचें घर शरीर. तें निरोगी असेल तर मन निरोगी राहील. दोन्ही निरोगी असतील तेव्हां मनुष्यापासून पराक्रमाचीं कामें होतील. मनास उल्हास वाटल्याशिवाय कोणतेंही काम नेटानें करतां यावयाचें नाहीं. निरोगीपणाशिवाय उत्साह राहणें शक्य नाहीं. प्रपंचांत येणाऱ्या अनेकविध अडचणींशीं टक्कर मारण्यास, उत्साहशक्ति जबर असल्याशिवाय चालावयाचें नाहीं.

२ शेतकरी आपल्या शेतांत पेरण्याच्या बियाविषयीं जशी काळजी घेतो, तशी आपण आपल्या शक्तीच्या जोपासनेकरितां काळजी घेतली पाहिजे. शक्ति कायम रहावी व वाढावी, म्हणून आप-

त्यास सामर्थ्य असेल त्या मानानें आपण चांगलें अन्न खाल्लें पाहिजे. साधे पण स्वच्छ कपडे वापरले पाहिजेत. ताजी व स्वच्छ हवा मिळेल तेवढी मिळवावी. व्यायामाची हयगय करूं नये. वयोमानाप्रमाणें सर्व गोष्टींत फरक करावा. भलतेसे पदार्थ आपणांस आवडतात, किंवा सोसतात, म्हणून खाणें चांगलें नाहीं. प्रकृति निरोगी असतांना असले पदार्थ आरंभीं सोसतात, पण पुढें तेच पदार्थ जाचणारे होऊन, शरीरांत अनेक रोग उत्पन्न करितात. पूर्वी आमची प्रकृति निरोगी होती, पण आतां पोटदुखी, कपाळदुखी, किंवा असेच कांहीं दुसरे रोग जडल्यामुळें ती फार अशक्त झाली, असें सांगणारे पुष्कळ लोक आपल्यास आढळतील; पण हीं दुखणीं त्यांस उगीचच्या उगीच जडलीं काय? असें कधींही ह्मणतां यावयाचें नाहीं. हें सारें बहुधा त्यांच्या अनियमित वर्तनाचें फळ असतें. एखादा रोग जसा हळूहळू कमी होतो, तसाच तो हळूहळू वाढतो. अमुक विकार आपल्यास जडेल, असें वाटल्यास वेळच्यावेळीं जपल्यास तो वाढणार नाहीं, न जपल्यास वाढेल. वडिलार्जित शरीरसंपत्तीच्या बळावर कांहीं दिवस निभावलें, तरी अनियमित वर्तनाचा परिणाम उतार वयांत आपल्यास, व पुढील संततीस सर्वकाळ, बाधक होण्याचा पुष्कळ संभव आहे.

३ सरकार आपलें रक्षण करणारें आहे, ह्मणून आपण कमकुवत होणें चांगलें नाहीं. आपण सशक्त असलों ह्मणजे आपलें रक्षण आपण करूं, व वेळेवर सरकारासही आपण मदत करूं शकूं. समाजांतील सर्व किंवा बहुतेक व्यक्ति दिवसानुदिवस अशक्त बनूं लागल्यास तो समाज नामशेष होईल. निर्जीव मनुष्यांच्या समुदायापासून कोणतेंही पराक्रमाचें काम होणार नाहीं, याकरितां प्रत्येक व्यक्तीनें आपली प्रकृति निकोप राखण्याचे प्रयत्न करावे.

४ पूर्वींची व हल्लींची स्थिति यांत पुष्कळ अंतर पडलें आहे. पूर्वीपेक्षां सुखाचीं साधनें हल्लीं वाढलीं आहेत. पण सुखाचीं साधनें द्रव्याशिवाय मिळणें शक्य नाहींत, यामुळें दिवसेंदिवस मनु-

त्यांचा खर्च वाढत चालला आहे. अधिक खर्च करावयास अधिक पैसा पाहिजे, व अधिक पैसा मिळविण्यास अधिक श्रमांची जरूर आहे. अधिक श्रम करावयास सामर्थ्य अधिक पाहिजे, तें निरोगी प्रकृति असल्याशिवाय मिळावयाचें नाहीं; याकरितां प्रकृति निरोगी राखण्यास प्रत्येकानें जपावें.

५ हल्लीं उद्योगधंद्यांची वाढ होत आहे, व त्यांत वेगळे वेगळे अनेक प्रकार होत आहेत. सर्वच धंदे प्रकृतीला मानणारे अस-तात, असें नाहीं. सर्व धंद्यांत सर्वच स्नायूंना व्यायाम घडतो, असेंही नाहीं. याकरितां वेगवेगळ्या व्यायामांची जरूरी उत्पन्न झाली आहे. मानसिक श्रम विशेष करणारांस शारीरिक व्यायाम उप-योगीं पडेल, शारीरिक श्रम करणारांस मानसिक व्यायाम उप-योगीं पडेल. उघड्या हवेंत काम करणारांस घरांतला व्यायाम सोईचा होईल, एकजागीं बसून काम करणारांस मोकळ्या हवें-तला व्यायाम सोईचा होईल. शरीराच्या एखाद्याच अवयवास किंवा एखाद्याच शक्तीस विशेष ताण पडूं नये याकरितां जपावें, व योग्य तितका व्यायाम अवश्य करीत जावा.

६ सार्वजनिक व्यायामाचीं ठिकाणें व प्रकार वाढवावे; त्यांत व्यायाम करणें अप्रतिष्ठेचें आहे, असा समज धरूं नये. शरीरास व्यायाम घडल्याशिवाय त्यांतील यंत्रें साफ राहावयाचीं नाहींत. ज्या स्नायूंस हालचाल करावी लागणार नाहीं, ते अशक्त राहतील. ज्या इंद्रियांचा उपयोग आपण करून घेणार नाहीं, तीं नष्ट होतील, किंवा त्यांची शक्ति कमी होईल; ज्यांचा उपयोग करून घेऊं तीं बळकट व अधिक तीव्र होतील. यावरून हें उघड आहे कीं आपल्या सर्व अवयवांस व्यायाम घडला पाहिजे. तो घडण्याकरितां योग्य ते प्रयत्न करावे. निर्वाहाकरितां कराव्या लागणाऱ्या कामांत ज्या स्नायूंस व्यायाम घडत असेल, त्या स्नायूंस विसावा मिळावा, व इतरांस व्यायाम घडावा, असे व्यायामाचे प्रकार निवडून काढावे.

७ प्रत्येकानें पूर्ण मनुष्य बनण्याचा प्रयत्न करावा, कारण त्याशिवाय खरें थोरपण प्राप्त व्हावयाचें नाहीं, व खऱ्या सुखाचा लाभ व्हावयाचा नाहीं. नुसती शारीरिक शक्ति वाढल्यास ती लोकांस ताप देणारी होईल. नुसती मानसिक शक्ति वाढल्यास शारीरिक शक्तीशिवाय तिचा योग्य उपयोग करतां येणार नाहीं. नैतिक शक्ति आंगीं असल्याशिवाय या दोन्ही शक्तींचा उपयोग परोपकाराकडे करतां येणार नाहीं. याकरितां ही पूर्णत्वाची कल्पना आईबापांनीं आपल्या ध्यानांत ठेवावी, व ती साधण्याचा प्रयत्न करावा.

८ आरंभीं सर्वांचीच प्रकृति चांगली असण्याचा संभव नसतो. तरी यत्नानें ती दुरुस्त ठेवितां येईल. सर्व आयुष्यांत औषधाचा उपयोग करावा लागला नाहीं, अशीं माणसें पूर्वी बरींच आढळत. हल्लीं तेवढीं आढळत नाहींत. तरी आपल्या प्रकृतींत उणीव काय आहे, ती शोधून काढून नाहींशी करण्याचा प्रयत्न आपल्यास करतां येईल; आपल्या परिश्रमानें व योग्य वागणुकीनें ती सुधारतां येईल, व आपल्यास पूर्वींपेक्षां सशक्त व तेजस्वी बनतां येईल. **'प्रयत्नांतीं परमेश्वर'** या ह्मणीवर योग्य लक्ष ठेवून प्रयत्न केल्यास, मनोवासनांच्या जाळ्यांत न सांपडतां सन्मार्गानें वागल्यास व आपल्या जन्माचा सदुपयोग करावयाचा अशी दृढ भावना ठेवल्यास, **सर्वेश्वर** आपल्या कृपाप्रसादानें सर्वांस सिद्धि देईल, कोणाचीही उपेक्षा करणार नाहीं.

९ जी गोष्ट शारीरिक शक्तींस लागू आहे, तीच मानसिक शक्तींस व नैतिक वासनांसही लागू आहे. मानसिक शक्ति ही अभ्यासानें वाढवितां येईल. चांगलें काम करावयाचें असा एकदा दृढ

---

१ **मिल्ल, स्पेन्सर**, इत्यादि आधुनिक तत्ववेत्त्यांची पूर्णत्वास पावलेल्या मनुष्याबद्दल कल्पना अशी आहे. "शारीरशक्ति, मानसिक शक्ति, नैतिक वासना, इत्यादि सर्व ज्याच्या पूर्ण झाल्या आहेत, ( पूर्णदशेस आल्या आहेत ) तो पूर्ण मनुष्य." **स्वातंत्र्य**—स्पष्टीकरणार्थ टिपा पृष्ठ ५० रकाना १.

निश्चय केल्यावर, कितीही विघ्नें आलीं तरी तीं सोसण्याची शक्ति येईल, व तीच संवय वाढत गेल्यावर तोच स्वभाव बनून जाईल. दुसऱ्यास दुःख द्यावयाचें नाहीं, असा दृढ निश्चय झाल्यावर नैतिक वासना प्रबळ झाल्याशिवाय राहणार नाहींत.

१० शारीरशक्ति पुरुषांची तेवढी सुधारली ह्मणजे झालें, असें ह्मणून चालावयाचें नाहीं; ती स्त्रियांचीही सुधारली पाहिजे. त्यांसही योग्य तो व्यायाम घेण्यास अडचण नसावी. शेतकऱ्याचें शेतांत लावण्याच्या बियास मात्र जपून चालत नाहीं, त्यास शेताचीही मशागत करावी लागते. वेळच्या वेळीं बांध दुरुस्त करणें, जमीन चांगली फोडून साफ करणें, शेतांत खत घालणें, जमीन भाजून तयार करणें, वगैरे क्रिया न केल्यास त्याचें शेत व्हावें तसें फलद्रूप होणार नाहीं; त्याप्रमाणेंच ज्या शक्ति पुरुषांस हितकारक आहेत, त्या सर्व स्त्रियांसही हितकारक आहेत; व उभयतांच्या सर्व शक्तींचा फायदा संततीस मिळावयाचा आहे; याकरितां ह्या पुस्तकांतील सर्व गोष्टी आईबापांस उद्देशून लिहिल्या आहेत; तरी स्त्रियांबद्दल वेगळें दिग्दर्शनही कोठें कोठें करणें इष्ट आहे. कारण आमच्या समाजांत उभयतांच्या ह्मणजे स्त्रीवर्ग आणि पुरुषवर्ग यांच्या आचरणांत बराच फरक असतो.

११ कित्येक ठिकाणीं घरांतील कामानें स्त्रियांचा चुराडा उडत असतो, तर कित्येक ठिकाणीं त्यांस कांहीं कामच नसतें. या दोन्ही गोष्टी सारख्याच अहितकारक आहेत. घरांतील काम बायकांनीं करावयाचें, पण तें जर त्यांस झेंपत नसलें तर पैसा खर्च करून किंवा अन्य रीतीनें त्यांस मदत केली पाहिजे. तशी तजवीज लागण्यासारखी नसल्यास—एका हातांत फार ओझें झाल्यास त्याचा भार आपण जसा दुसऱ्या हातावर टाकतों, त्याप्रमाणें—पुरुषानें आपल्या अर्धांगीस श्रमविभागाच्या तत्वाप्रमाणें साह्य केलें पाहिजे; त्याशिवाय गत्यंतर नाहीं. ज्या ठिकाणीं स्त्रियांस घरांतलें काम करावें लागत नाहीं, त्या ठिकाणीं त्यांस नुसत्या गौरींप्रमाणें बसवून ठेवूं नयेत. त्यांस तोच वेळ कळाकुसरीचीं कामें करण्यांत,

किंवा परोपकाराचीं कामें करण्यांत, किंवा लिहिण्यावाचण्यांत, दवडण्याची संवय लावल्यास फार चांगलें होईल. रिकामें बसून स्थूळ बनण्यापेक्षां—तुळशीला प्रदक्षिणा घालण्याचें,—धर्मभोळे-पणाचें-काम केलें तरी चिंता नाहीं, त्यापासून शरीरप्रकृति सुधारण्याचा फायदा तरी निःसंशय पदरांत पडेल.

१२ संततीच्या रक्षणाचें सर्व ओझें स्त्रियांवर पडावयाचें असतें. याकरितां त्यांची शरीरसंपत्ति अधिक चांगली असावी लागते. बाळंतपण—ह्मणजे एक—पणच आहे, यांत कांहीं संशय नाहीं. प्रकृति सशक्त असल्यास बाळंतपण सुखानें पार पडतें. अशक्त स्त्रियांस तें फार जड जातें, व पुष्कळ वेळां त्यांच्या जिवावरही प्रसंग येतो. याकरितां स्त्रियांनीं आपल्या आरोग्याकडे अधिक लक्ष द्यावें. गरोदरपणांत त्यांची प्रकृति निरोगी असल्यास होणारें बाळक निरोगी होतें, तें लहान असतां त्यास रोग झाला नाहीं, तर पुढें त्याची प्रकृति सहसा बिघडत नाहीं, त्यास निरोगी दूध मिळाल्यास तें गोंडस व टवटवीत होतें. मुलांची वाढ सर्वस्वीं स्त्रियांच्या निरोगीपणावर अवलंबून आहे. याकरितां स्त्रियांनीं आपल्या प्रकृतीची हेळसांड सहसा करूं नये.

## ६ विवाहित स्थितीविषयीं आधीं विचार करावा.

१ मनुष्यास एकटें राहाणें आवडत नाहीं. तो संगतिप्रिय प्राणी आहे. यामुळें पुरुषांची किंवा स्त्रियांची विवाहाकडे ओढ असते, हें ठीकच आहे. परंतु विवाह करण्यापूर्वीं त्यांनीं पुष्कळ विचार करावा. तो विचार बरेच वेळां होत नाहीं, यामुळें पुढें अडचणी उत्पन्न होतात. विवाह स्त्रीपुरुषांनीं आपल्या सुखाकरितां करावयाचा आहे, पण पुष्कळ वेळां तो त्यांस दुःख देणारा होतो. याकरितां विवाह केल्यावर ज्या अडचणी उत्पन्न होण्याचा संभव आहे, त्यांचा पूर्वीं विचार करावा. संतति हें विवाहाचें फळ आहे. तें प्राप्त झाल्यावर त्याचें यथास्थित रक्षण करण्याचें जोखीम विवाहितांस पतकरिलें पाहिजे. केवळ स्वसुखावर लुब्ध होऊन संत-

तीच्या सुखाकडे दुर्लक्ष त्यांस करितां येणार नाहीं. मानवजातीस तर तें बट्टा लावणारें आहे. संतति चांगली असावी, असा त्यांचा हेतु असावा. दुबळी संतति झाल्यास त्या संततीला तर दुःख भोगावें लागतेंच, पण आईबापांसही दुःख भोगावें लागतें. पुष्कळ संतति झाली तरीही हाच प्रकार होतो. संततीबरोबर आईबापांची प्राप्ति वाढणें सर्वदा शक्य नसतें. असलेल्या प्राप्तींत त्यांचा निर्वाह प्रथम सौख्यानें होत असतो, पण एकदा संतति वाढत चालली ह्मणजे तो होणें कठीण पडतें. तेव्हां आईबापांनीं पहिल्यापेक्षां अधिक श्रम करून द्रव्य संपादन केलें पाहिजे, किंवा असलेल्या खर्चांत काटकसर करून निर्वाह केला पाहिजे. उभयतांनीं नियमितपणाचें वर्तन ठेवल्यास त्यांस आपला संसार सुखाचा करितां येतो, तसें न झाल्यास संसाराचा बिघाड होतो. या गोष्टींचा विचार आईबाप होणारांनीं विवाहापूर्वी करावा. विवाहानंतर खर्च वाढणार हें ठरलेलेंच आहे. संतति होणार व तिच्या जोपासनेचा बोजा आंगावर पडणार यांतही संशय नाहीं. तेव्हां पुढील वागणुकीचा विचार आधीं ठरला असल्यास पुढें होणारी कुतरओढ, जळफळाट, संसाराचा उत्पन्न होणारा वीट, इत्यादि गोष्टी टाळतां येतील.

२ विवाह हें व्यक्तिमात्राच्या सुखाचें साधन आहे, त्याप्रमाणें तें समाजाच्या सुखाचेंही साधन आहे. कारण समाज व्यक्तींच्या समुदायानें होतो. व्यक्ति जितक्या जोमदार असतील, तितकी समाजाची बळकटी अधिक असेल. अशक्त व्यक्तींचा समाजही अशक्तच असणार. याकरितां विवाहित जोडप्यानें सुखानें नांदावें, इतकाच विवाहाचा हेतु मनांत आणून चालावयाचें नाहीं. यापेक्षां विवाहाचा हेतु अधिक महत्वाचा मानला पाहिजे. पुढील उतारा पाहाः—

'विवाहित जोडप्यास सुख व्हावें, हा लग्नाचा उद्देश नेहमी असतोच. पण लग्नापासून जी संतति होईल, ती चांगली निपजून हातातोंडास यावी, हा उद्देश यापेक्षांही श्रेष्ठ समजला पाहिजे.

प्रत्येक कुटुंबांत चांगली संतति ( सशक्त व निरोगी ) उत्पन्न झाली, तरच एकंदर मानवजातीची सुधारणा होत जाऊन माणसाचा जास्त जास्त अभ्युदय होत जाणार."

आत्मनीतीचीं तत्वें—पृष्ठ. १८०

३ ही गोष्ट आईबापांनीं लक्षांत बाळगावी. आपली संतति कार्यकर्ती व्हावी, म्हणून त्यांनीं प्रयत्न करावे. समाजास भारभूत संतति होऊं नये ह्मणून काळजी घ्यावी, कारण हें त्यांचें कर्तव्यच आहे. विवाहापासून होणाऱ्या सुखाचा लाभ मात्र त्यांनीं घ्यावा, व निर्जीव, व्यंग, अशा संततीचा भार समाजावर टाकावा, हें त्यांस भूषणास्पद नाहीं. पुढील उतारा पाहा:—

"प्रजोत्पादनापासून सुख होईल तेवढें मात्र भोगावयाचें; त्या मुलांचें पालन, पोषण, किंवा शिक्षण, ह्यांची जबाबदारी लोकांवर टाकावयाची, असें मात्र कामाचें नाहीं. सुखोपभोग व आंगावर पडणारी जबाबदारी, यांची नेहमी सांगड असली पाहिजे. जो कोणी सुखोपभोग घेईल, त्यानें तज्जन्य यातना भोगण्यास तयार असलें पाहिजे."

आत्मनीतीचीं तत्वें—पृष्ठ. १८१

यावरून इतकें लक्षांत येईल कीं, विवाह करावयाचा ह्मणजे होणाऱ्या संततीच्या जोपासनेचें काम आंगावर घ्यावयाचें असें समजलें पाहिजे.

४ मुलें झाल्यावर आईबापांवर मोठी जबाबदारी पडते, यांत संशय नाहीं. पण त्यांनीं विवाह करण्याचें पतकरिलें ह्मणजे ही जबाबदारी त्यांची त्यांनीं पतकरली पाहिजे. ही पतकरणें ह्मणजे मोठें कठीण आहे, असेंही नाहीं. कारण त्यांस 'आईबाप' हा किताब संततीपासूनच मिळतो. ज्यांस संतति नाहीं, त्यांस आईबाप कोण ह्मणेल ? त्यांचें आयुष्य पुष्पहीन व फळहीन वृक्षासारखें समजावयाचें. संततीचें पालनपोषण करण्यांत त्यांस एकप्रकारचें सुखही मिळतें. त्यांच्यावर संततीपासून अनेक प्रकारचे सुख-

कारक परिणाम घडतात. पुढील उतारा पाहाः—"लग्नापूर्वी जी मुलगी केवळ निश्चित रीतीनें वागत असते, तीच मुलगी लग्न झाल्यावर प्रथम नवऱ्याचे व मग संततीचे सेवेंत तत्पर राहूं लागते; तिला त्यांच्याशिवाय कांहीं सुचत नाहीं; अशीं कितीतरी उदाहरणें दृष्टीस पडतात. तसेंच जो माणूस लग्नापूर्वी कदाचित् तिरसट स्वभावाचा व दयामायाहीन असतो, तोच माणूस लग्न होऊन मुलेंबाळें झाल्यावर बायकोसाठीं पाहिजे ती झीज सोसण्यास तयार होतो; व मुलाबाळांचें काडीभर कमी पडूं नये ह्मणून नेहमी काळजी वाहात असतो; शिवाय सर्वप्रकारीं पूर्वीपेक्षां अधिक आत्मसंयमन करूं लागतो. विनाकारण चैन करणें, किंवा चैनींत फाजील पैसा खर्च करणें, शरीरास फाजील त्रास देणें, बाहेरून घरीं वेळेवर परत न येणें, जिवाबद्दल बेफिकीर राहाणें, या गोष्टी कमी होतात; अशीं उदाहरणें थोडीं थोडकीं दृष्टीस पडतात, असें नाहीं." **आत्मनीतीचीं तत्वें**-पृष्ठ. १५७।१५८

५ संतति झाल्यावर आईबापांच्या मनांत प्रेम उत्पन्न होतें, व तीं प्रेमानें वागतात, व मुलांच्या कल्याणाच्या गोष्टी करतात, यांत शंका नाहीं; पण त्यांनीं संतति होण्यापूर्वी पुढल्या अडचणी मनांत आणून, त्यांच्या तरतुदीबद्दल विचार व तयारी करून ठेवणें अधिक चांगलें. कारण संसार सर्व करितात; कसा तरी तो तडीला जातो; पण तो जेवढ्या गुण्यागोविंदानें तडीस जावा, तेवढ्या गुण्यागोविंदानें फार थोड्यांचा जातो. याचें कारण पुढील स्थितीचा विचार आधीं केलेला नसतो. याकरितां पुढील स्थितीचा विचार होतां होई तों आधीं करणें चांगलें.

६ संसार हा दुर्भर आहे, असें संस्कृत कवींनीं वारंवार ह्मटलें आहे, तें खोटें नाहीं. संसारांत मनुष्यांस नेहमी उणेपणाच वाटत असतो, तो कधीं भरून येत नाहीं. पण असलेल्या गोष्टींत तृप्ति मानीत गेल्यास व त्या गोष्टींपासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेतल्यास, तें कांहीं थोडें नसतें, असाही अनुभव येईल.

७ मनुष्य प्रथम विवाहाची इच्छा करतो. विवाह झाल्यावर

एकमेकांचे स्वभाव एकमेकांस पुष्कळ वेळां पटत नाहींत. पण प्रथम स्वभावांची ओळख करून घेऊन मग विवाह केल्यास ही अडचण टाळितां येईल. पुढें संतति होऊं लागली, ह्मणजे ती मनासारखी, बेताची, होईल असा काय नियम आहे? तेव्हां ती कशीही झाली, तरी तिची जबाबदारी उभयतांनीं पत-करली पाहिजे. नाहींतर एकमेकांवर दोषारोप करून झगडण्यांत नफा कोणता? ह्मणून या बाबतींतही आधीं विचार झालेला असल्यास बरा. प्रथम जी प्राप्ति असते, ती पुढें वाढतेच, असाही नियम नसतो. पैसा कितीही मिळाला तरी पाहिजे असतो, पण तो मिळाला पाहिजेना! मिळाल्यास ठीकच आहे, पण न मिळाल्यास असलेल्या पैशांत काटकसर करून राहिलें पाहिजे. पण याचा विचार पूर्वीं झाला नसल्यास या गोष्टी पुढें फार कठीण पडतात. संसार ह्मणजे केवळ सुखाचें साधन अशी कल्पना असते, यामुळें रोजच्या व्यवहारांत अंमळ इकडचें तिकडे झालें कीं घडी बिघडली असें वाटतें, किंवा किरकोळ विघ्नांनीं सुद्धां घाबरगुंडी उडते; पण संसाराची यथार्थ कल्पना पूर्वींच मनांत ठसली असल्यास व संसाराबरोबर येणाऱ्या जबाबदाऱ्यांची ओळख पूर्वीं पटली असल्यास, तितकें अवघड वाटणार नाहीं.

## ८ मुलांचें संगोपन करावयास शिकावें.

१ आईबापांस विशेषेंकरून आयांस—मुलांचें संगोपन कसें करावें याचें थोडेंबहुत ज्ञान असावें. पुरुष बहुधा बाहेरच्या कामांत गुंत-लेले असतात, घरांतलें काम बायकांकडे असतें. तेव्हां घरांत नेहमी राहण्याचा प्रसंग स्त्रियांसच असतो. हा क्रम आतांचा नाहीं, पूर्वीं-पासूनच आहे. ह्मणून शिशुसंगोपनाचें काम विशेषेंकरून आयांनीं माहीत करून घेतलें पाहिजे, म्हणजे प्रसंगीं त्यांची धांदल उडावयाची नाहीं. मुलांस बारीकसारीक दुखणीं नेहमी येतात. त्यांस सामान्य उपचार करावयाचें काम स्त्रियांस माहीत असावें. प्रत्येक वेळीं वैद्याकडे किंवा डाक्तराकडे धांवणें चांगलें नाहीं.

२ बाळकडूची करंडी अलीकडे–विशेषतः शहरांतून–अगदीं नाहींशीच झाली आहे! कोणत्याही दुखण्यावर वेळेवर उपचार झाले पाहिजेत, नाहींतर तीं दुखणीं बळावण्याचा संभव असतो. किरकोळ आजारांवरील आरंभींचे उपचार आयांस माहीत असावे, ह्मणजे मुलांस दुखणीं येतांच त्या घाबरणार नाहींत. तसें नसलें ह्मणजे संततीचें दुःख पाहून त्यांचीं आंतडीं नुसतीं तुटतील, पण त्यामुळें संततीचें दुःख तिळभरही कमी होणार नाहीं. पाण्यांत पडलेल्या मनुष्याकडे पाहून कडेवर राहून नुसत्या हळहळणाऱ्या माणसांचा, पाण्यांत बुडणाऱ्या माणसास जसा उपयोग होत नाहीं, त्याप्रमाणें असल्या अज्ञान आईबापांचा संततीस उपयोग होणार नाहीं. ह्मणून संततीच्या संगोपनाचें व त्यांस औषधपाणी देण्याचें साधारण ज्ञान आईबापांनीं–विशेषतः आयांनीं–अवश्य करून घ्यावें.

## ९ व्यसनांपासून दूर राहावें.

१ कोणतेंही व्यसन नसणें चांगलें. कारण त्यापासून कोणताही लाभ होत नाहीं. तरी व्यसनाधीन माणसें फार आढळतात. इतकेंच नव्हे तर आपल्या व्यसनांचा गौरव करावा, असेंही कित्येकांस वाटतें. आतां हें खरें कीं, जगांत निरर्थक वस्तूच जर नाहीं तर अंमल उत्पन्न करणारे लहानमोठे पदार्थ तरी निरुपयोगी कसे असतील? पण ते निर्वाहास लागणाऱ्या अगत्याच्या पदार्थांत तरी येत नाहींत, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सामर्थ्यानुरूप बारीकसारीक व्यसनें फारशीं बाधा करीत नाहींत हें खरें, पण तीं व्यसनेंच; व तीं नसतील तितकीं चांगलीं, असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं.

२ जवळ तपकिरीची डबी ठेवून तिची चिमटी वरचेवर ओढणें, तंबाखूची चिमटी वरचेवर तोंडांत टाकणें, विड्यांचे जुडगेच्या जुडगे पार करणें, किंवा चहाकाफीचा फन्ना पाडणें, हीं मोठींशीं व्यसनें नव्हत, असें कित्येक ह्मणतात. पण जेव्हां त्यावांचून अडूं लागतें, तीं सुटत नाहींत, तीं न मिळाल्यास प्रकृतीवर वाईट

परिणाम घडतातसें वाटतें, तेव्हां त्यांस व्यसनांत गणण्यास काय हरकत आहे? एकसारखें काम ज्यांस करावें लागतें, त्यांस विसांव्याकरितां अशा कांहीं गोष्टींची जरूरी असते, असें पुष्कळांस वाटतें. पण या गोष्टी एकदा अशा निमित्तानें पुढें आल्या, ह्मणजे मग त्यांचेंच वर्चस्व व्यक्तींवर होतें! तींच पुढें पैशाचा रिकामा खर्च होण्याचीं साधनें बनून जातात! एखाद्या वेळेस चहाकाफी वा एखादा पेला घेतला, प्रसंगविशेषीं तंबाखूची एखादी चिमटी तोंडांत टाकली, किंवा विडी ओढली, ह्मणजे बिघडलें असें नव्हे. पण चहाचे पेल्यांवर पेले लागूं लागले, किंवा दिवसांतून दोनतीन वेळ चहा मिळाल्याशिवाय चालेनासें झालें; जेवण न मिळालें तरी चालेल, पण चहा मिळाला पाहिजे असें होऊं लागलें; विड्यांचे जुडग्यांचे जुडगे खपूनही समाधान होईनासें झालें, चिरूटांची प्रार्थना करण्याची गरज भासूं लागली; ह्मणजे त्यास व्यसन ह्मणूं नये तर काय ह्मणावें?

३ कोणत्याही मनुष्यास असें व्यसन असणें चांगलें नाहीं. घरांतील पुढाऱ्यास एकदा व्यसनानें गांठलें म्हणजे सर्व कुटुंब हळू हळू व्यसनाधीन होऊन जातें; निदान तसें होण्याचा संभव तरी उत्पन्न होतो, व घरांतील पुष्कळ पैसा व्यर्थ जातो. याकरितां आईबापांनीं–होतां होई तों–या क्षुल्लक व्यसनांचा सुद्धां शिरकाव आपल्या घरांत न होऊं देण्याकरितां जपणें चांगलें. जोंपर्यंत प्रपंचाचा पसारा फारसा नसतो, तोंपर्यंत असल्या व्यसनांपासून होणारा अपाय फारसा दिसणार नाहीं, पण चार मुलेंबाळें झालीं म्हणजे हाच खर्च आपल्यास भंडावून सोडील. **'हांतरूण पाहून पाय पसरावे'** या तत्वाचा धडा आरंभापासून गिरविला नसल्यास तो एकदम साधणार नाहीं; व एक रिकामी खर्चाची बाब आपण आपल्या घरांत घुसवून घेतल्याबद्दल आपणांस पश्चात्ताप करण्याची वेळ येईल.

४ अफूनें कित्येकांच्या हाडांचीं काडें झालेलीं आपण ऐकतों; गांजाच्या चिलमेनें कित्येकांनीं आपल्या संसाराची राखरांगोळी

केलेली आपल्यास माहीत आहे; भांगेचे लोटे पिऊन बेहोष झालेलीं माणसें आपल्यास केव्हां केव्हां दिसतात, व दारूच्या पायीं गटारांत लोळणारीं माणसें आहेत असें ही ऐकावयास येतें; हीं व्यसनें व्यसनें म्हणून गाजलेलींच आहेत, तेव्हां यांपासून दूर राहाण्याबद्दल वेगळें सांगावयास पाहिजे असें मुळींच नाहीं. कोणत्याही धर्मांत व्यसनें हीं त्याज्यच मानलीं आहेत, तेव्हां त्यांचा संपर्क न लागूं देण्याविषयीं प्रत्येक आईबापानें झटून प्रयत्न करावा.

५ लहान व्यसनें जर त्याज्य आहेत, तर त्यापेक्षां मोठ्या दर्जाचीं व्यसनें–**अफू, भांग, गांजा, दारू**–त्याज्य आहेत, हें काय सांगावें? खरोखर पाहिल्यास मनुष्याच्या जीवितास फार थोड्या वस्तूंची अपेक्षा असते. साधें जेवण व स्वच्छ पाणी यांपासून त्याच्या जीवितयात्रेची सर्व तजवीज लागते. आपल्या श्रीमंतीप्रमाणें कोणी खर्च करूं नये, सर्वांनीं दरवेशासारखें वागावें, असा या म्हणण्याचा भाव आहे, असें नाहीं. ज्याच्याजवळ ऐश्वर्य असेल, त्याणें त्याचा खुशाल उपभोग घ्यावा, पण तो व्यवस्थित रीतीनें घ्यावा. त्या उपभोगानें त्याच्या शरीरसंपत्तीस अपाय होऊं नये, किंवा त्याच्या कुटुंबाचा किंवा मुलाबाळांचा घात होऊं नये. कोणींही केवळ आपलपोटें बनूं नये. माझ्या दैवानें मिळालें आहे, मी त्याचा उपभोग घेईन, पाठीमागें कांहीं कां होईना, असल्या वेडगळ विचारांच्या स्वाधीन होऊं नये. आपल्या आईबापांच्या दयेनें आपलें रक्षण झालें व आपण थोर झालों, त्याप्रमाणेंच आपल्या संततीकरितां आपण कष्ट सोसले पाहिजेत. गाड्याघोडीं बसावयास असलीं तर त्यांत बसूं नये, असें कोणी म्हणत नाहीं; पण गाड्याघोडीं उडवण्यांत चूर होऊन, आपलें सर्वस्व गमावण्याची वेळ येणें चांगलें नाहीं. अनेक पक्वान्नें खाण्याचें सामर्थ्य असल्यास तीं खुशाल खावीं; पण त्यापासून शरीरपुष्टि प्राप्त झाली पाहिजे; तोंडाला अरुचि पडण्याचा प्रसंग येतां उपयोगी नाहीं; किंवा पक्वान्नें खाण्याच्या चटीनें साध्या अन्नासही महाग होण्याचा प्रसंग येतां कामा नये. वडिलांनीं

पक्वान्नें झोडून सर्वस्वाचा फडशा उडवावा, व संततीस साधें अन्नही वेळेवर मिळण्याची पंचाईत पडावी, असेंही होतां उपयोगीं नाहीं. साध्या अन्नानें व स्वच्छ पाण्यानें जर आमचें आयुरारोग्य यथास्थित राहूं शकतें, तर असल्या आडमार्गांत आम्हीं कां शिरावे ? अशा रीतीनें द्रव्याचा व्यर्थ व्यय करूंनये. सामर्थ्य असल्यास गरीबगुरिबांचा समाचार घ्यावा. ज्यांस मुळींच खावयास मिळत नाहीं, त्यांस एकवेळ खावयास घालण्यांत जर आपल्या द्रव्याचा व्यय केला, तर तीं माणसें खास आपल्यास दुवा देतील.

६ तरणेताठे गडी, गलेलठ्ठ मंडळी, व्यसनाच्या नादानें **सुदामदेव** बनलेली कोणी पाहिली नाहीं ? गुलाबी गाल, फिरलेले दंड, हे व्यसनाच्या तडाक्यांत सांपडल्यावर सुरकुतलेले किंवा खोल गेलेले कोणीं पाहिले नाहींत ? व्यसनासारखें शरीरसंपत्तीची हानि करणारें दुसरें कारण सांपडणार नाहीं. व्यसनी मनुष्यास व्यसनासाठीं अधिक पैसा खर्चावा लागतो. त्याच्याजवळ असलेला पैसा हळूहळू खर्चून जातो. नवा मिळविण्याचें सामर्थ्य असल्यास कांहीं सोय असते, नाहींतर मोठी पंचाईत पडते. व्यसनाचा अंमल अधिकाधिक बसूं लागला, म्हणजे त्याचें सामर्थ्य बहुधा कमी होऊं लागतें. यामुळें उत्तरोत्तर त्याच्या विपत्तीस भरती येऊं लागते. **'बुडत्याचा पाय खोलांत'** या म्हणीप्रमाणें त्याची अवस्था होते. पैसा कमी झाला किंवा कमी मिळूं लागला, म्हणजे व्यसनी मनुष्याच्या स्थितींत सुधारणा व्हावी असें वाटतें, पण तसें घडत नाहीं. तो उत्तरोत्तर जास्त व्यसनाधीन बनतो, चोरीसारख्या कित्येक दुर्गुणांचा त्यास मोह पडतो; व कड्यावरून सुटलेला पदार्थ जसा उत्तरोत्तर जास्त गुरुत्वशक्तीच्या अधिक ताब्यांत सांपडल्यामुळें अधिक पराधीन होतो, त्याप्रमाणें व्यसनाधीन मनुष्य उत्तरोत्तर अधिक व्यसनमग्न होतो; व गुरुत्वशक्तीच्या ताब्यांत सांपडलेला पदार्थ जसा शेवटीं जोरानें जमिनीवर आदळून फुटल्याशिवाय राहात नाहीं, तसा व्यसनाधीन मनुष्य शेवटीं नाश पावल्याशिवाय राहात नाहीं.

७ मनुष्य व्यसनाधीन झाला ह्मणजे त्याच्या व्यसनाचा परिणाम त्याला एकट्यालाच भोगावा लागतो असें नाहीं, त्याच्या दुष्परिणामाचें फळ त्याच्या कुटुंबास व संततीसही भोगावें लागतें. त्यास तें व्यसन बहुधा सुटत नाहीं; पैशाची खराबी होते; त्या मनुष्यावर आळस आपला पगडा बसवतो; व त्या मनुष्यास हळूहळू रसातळास पोंचवतो. इतक्यानेंच हा परिणाम थांबता, तरी बरें होतें, पण तसें घडत नाहीं. त्याच्या दुष्कृत्याचें फळ त्यास एकट्यासच मिळून राहात नाहीं. त्याचें कुटुंब, त्याची संतति, त्याचें कुळ, केव्हां केव्हां त्याचे इष्टमित्रही, त्याच्या या दुष्कृत्याच्या पायीं रसातळास पोंचतात. याकरितां आईबापांनीं व्यसनाच्या पाशांत सहसा गुंतू नये.

८ मद्यपान करणारा मनुष्य मद्याच्या धुंदींत आपल्या गृहिणीस अपशब्द बोलतो, तिला गुरासारखी मारतो, संततीची हेळसांड करतो, आपला पैसा मद्यपानांत खरचून टाकून कुटुंबास व मुलांस उपाशीं मारण्याचा प्रसंग आणतो, या गोष्टी किती वाईट असेत? खावयास न मिळालें तरी चालेल, मद्यपान मात्र चुकतां कामा नये, असें झाल्यामुळें त्याची शरीरसंपत्ति दिवसेंदिवस क्षीण होत जाते, कुटुंबाची काळजी वाढत जाते, शेवटीं एखाद्या दिवशीं आपल्या मुलांबाळांस दुःखसमुद्रांत लोटून तो चालता होतो!

९ जुगारी आपली संपत्ति जुगारांत घालवितो, आपण द्रव्यलोभानें भलभलत्या गोष्टी करूं लागतो किंवा भ्रमिष्ट बनतो, व आपल्या कुटुंबास हाय हाय करीत जन्म लोटावयास लावतो!

१० रंडीबाज द्रव्य तर घालवतोच; शिवाय स्वतांच्या प्रकृतीस इजा करून घेतो, अनेक प्रकारच्या व्याधींनीं ग्रस्त होऊन जातो, स्वतां दुःखानें खितपत पडतो, स्वतांच्या अर्धांगीस रोगाचें स्थान बनवतो, व पुढें होणाऱ्या संततीस जन्मतः रोगी बनण्याची सनद देऊन ठेवितो, आणखी या व्यसनापासून किती तोटे होतात हें काय सांगावें! तेव्हां लहान असो कीं मोठें असो, व्यसन तें व्यसनच. त्यापासून

अहितच व्हावयाचें, हें लक्षांत ठेवून आईबापांनीं कोणत्याही व्यसनास सहसा थारा देऊं नये.

## १० सामान्य गोष्टी.

१ ज्या ज्या वेळीं ज्या ज्या शिक्षणाच्या सोई असतील, त्या त्या वेळीं तें तें शिक्षण साधेल तितकें आईबापांनीं संपादन करावें, ह्मणजे त्यांस शिक्षणाची गोडी लागेल, त्याची किंमत कळेल, आपल्या संततीस शिक्षण देण्याकडे त्यांची साहजिक प्रवृत्ति होईल, व आपल्या संततीच्या शिक्षणास त्यांस स्वतां मदत करितां येईल.

२ आईबापांनीं आपलें आचरण नीतिशुद्ध व स्वधर्मास अनुसरून ठेवण्याचा नेहमीं प्रयत्न करावा, ह्मणजे संततीस नीतिशिक्षणाचा व धर्मशिक्षणाचा कित्ता घरांतच मिळेल. मुलांच्या दृष्टीसमोर असणारें आईबापांचें नीतिशुद्ध आचरणाचें वळण, त्यांच्या संततीस सहज लागेल. मुलें अनुकरणप्रिय असल्यामुळें आईबापांच्या शुद्ध आचरणाचा ठसा त्यांच्यांत–अंशतः तरी–उठल्याशिवाय राहणार नाहीं. आईबापांचे सर्वच गुण घेऊन तीं उठतील, असें ह्मणतां येणार नाहीं, पण कांहीं तरी सद्गुणांचा ठसा त्यांच्यांत प्रतिबिंबित झाल्याशिवाय राहणार नाहीं.

३ आईबापांची संगति मुलांस नित्य असते, तरी तीं मोठीं होऊं लागलीं, बाहेर हिंडूं फिरूं लागलीं, ह्मणजे त्यांच्या दृष्टीसमोर नित्य नव्या नव्या व विचित्र व्यक्ति येणारच; त्यांत कित्येक चांगल्या तशा कित्येक वाईटही असणारच; यामुळें त्यांच्या आचरणाच्या छटा मुलांवर मुळींच उमटणार नाहींत, असें ह्मणतां येणार नाहीं. पण आईबापांस सद्गुणांची प्रीति व दुर्गुणांचा तिटकारा वाटत असल्यास, इतरांच्या आचरणाचा परिणाम मुलांवर विशेष होणार नाहीं.

४ सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं 'संतति वाईट' अशी रिकामी कुरकुर न करतां प्रथम आपण आपली सुधारणा करावी, संततीवर काळजीपूर्वक योग्य नजर ठेवावी; ह्मणजे संततीस वाईट ह्मणण्याचा

प्रसंग फारसा येणार नाहीं. दीर्घ प्रयत्न केल्यास–हजार हिश्शांनीं आपल्या संततीस, आपल्यास इष्ट तें वळण लावितां येईल. बरें, आपण चांगला प्रयत्न करून तो सिद्धीस गेला नाहीं, तरी त्याबद्दल खेद करण्याचें कारण नाहीं. कारण, **'यत्ने कृते यदि न सिद्ध्यति कोऽत्र दोषः'** असें **भर्तृहरीनें** म्हटलें आहे.

५ आईबापांनीं आपल्या संततीच्या हिताकरितां मनापासून प्रयत्न करावे, म्हणजे त्यांच्या प्रयत्नांचें फळ त्यांस मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. सन्मार्गानें वागून संततीस तोच कित्ता लावून देणें हा मोठा परमार्थ आहे, त्याचा आश्रय केल्यानें–परमेश्वरकृपेनें–त्यांचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतील, व ते परमेश्वराच्या कृपेस पात्र होतील.

---

## भाग दुसरा—आईबापांची मुलांशीं वागणूक.

१ लहानपणीं मुलें अगदीं पराधीन असतात. गाईचें वांसरूं ताबडतोब उभें राहातें व स्तनपान करूं शकतें, तसें माणसाचें नाहीं. त्यांच्या ( लहानमुलांच्या ) खाण्यापिण्याची, लत्ताकपड्याची, काळजी आईबापांनीं घेतली, तर मात्र त्यांची जोपासना होण्याचा संभव असतो, एरव्हीं नसतो. मुलें लहानाचीं मोठीं होतात, तीं आईबापांच्या–विशेषतः–आईच्या प्रेमानें होतात, यांत कांहीं संशय नाहीं. **तुकारामानें** म्हटलें आहे. **'नलगे मातेसी बाळ निरवावें, आपल्या स्वभावें ओढे त्यासी'** तें अगदीं खरें आहे. आईचें प्रेम जगांत दुर्मिळ आहे. आईच्या देहांत कमीपणा आल्याशिवाय मुलांचें संगोपन व वाढ होणें शक्य नाहीं. गर्भ नऊ महिने आईच्या पोटांत असतो. त्याची वाढ आईच्या आंगांतील पोषक रसांपासून होत असते. मुलांच्या वाढीकडे जाणारे पोषक रस अर्थातच आईच्या शरीरांतून कमी होत असतात. मुलें उपजल्यावर तरी बहुधा आईच्या आंगावर प्यावयाचीं असतात. मुलांस मिळणारें दूध आईच्या शरीरांतील रक्तापासून उत्पन्न होतें. तेव्हां मुलांची

१ यत्न करून जर कार्य साधलें नाहीं, तर त्यांत दोष तो कोणता!

वाढ ह्मणजे आईची झीज, असें सहजच सिद्ध होतें. तरी ही झीज सोसण्यास आई सर्वकाळ तयार असते. हें केवळ तिच्या निसर्गसिद्ध प्रेमानें घडतें. आई कधीं प्रसूतिवेदनांनीं किंवा या झिजेमुळें अशक्त होते, तरी आपल्या अपत्यानें सुखी असावें—आपलें कांहींही होवो—ही तिची इच्छा कायम असते. यावरून आईचें प्रेम केवढें आहे, याची कल्पना होईल, तशीच आईच्या योग्यतेबद्दलही होईल.

२ बापाचीही संततीकरितां झीज सोसण्याची तयारी असते, पण ती अप्रत्यक्ष. प्रत्यक्ष झीज आईसच सोसावी लागते. ईश्वरी नियमही या गोष्टीस अनुकूल दिसतो. कांहीं लहान लहान प्राण्यांत पोरें उपजल्यावर आई मरते. विशेष सुधारलेल्या प्राण्यांत आईच्या आंगावर त्यांचें जीवन चालतें. आई ही झीज प्रेमानें सोसते हें खरें, पण कित्येक वेळां अज्ञानानें मुलांशीं वागण्यांत तिच्याकडून व केव्हां केव्हां आईबापांकडून पुष्कळ दोष घडतात. यामुळें त्यांच्या प्रेमाचा पुष्कळ वेळां दुरुपयोग घडतो. प्रेमांत किंवा प्रेमाच्या वागणुकींत थोडा कमीपणा झाल्यास संततीची योग्य जोपासना होणार नाहीं, व अधिकपणा झाल्यास संततीवर त्याचा चांगला परिणाम होणार नाहीं—ह्मणजे मुलें सद्गुणी न होतां बेताल होतील. यामुळें त्यांच्या आईबापांस सुख होणार नाहीं व संततीसही सुख होणार नाहीं; याकरितां आईबापांनीं मुलांशीं कशी वागणूक ठेवावी, याबद्दल थोडासा विचार करण्याचें योजिलें आहे.

३ आईबापांनीं आपल्या संततीवर योग्य प्रेम करावें, ह्मणजे तें प्रेम मर्यादित असावें. अगदीं लहानपणीं मुलांचा संबंध आईशीं अगदीं निकट असतो. बापाशीं पुढें थोडथोडा जडत जातो. मूल नेहमीं आईच्या जवळ असणार, तिच्या आंगावर पिणार व तिच्याशीं खेळणार. आई त्यास वेळच्यावेळीं खावयास घेत असली, रडवीत नसली, तर मुलगें तिरसट निघणार नाहीं. पण जी आई मुलगें होण्यापूर्वी मुलाकरितां आतुर झालेली असते,—धर्मभोळी असल्यास पिंपळाचे पार झिजविण्यास कमी करीत नाहीं—ती

सुद्धां केव्हां केव्हां आई झाल्यावर मागल्या गोष्टी विसरते; मुलास वेळच्यावेळीं खावयास घेत नाहीं, तें रडून आकांत करीपर्यंत त्यास उचलून घेत नाहीं, याला काय ह्मणावें! आतां ह्या गोष्टी ती मुद्दाम करते, असें ह्मणणें नाहीं. केव्हां केव्हां अज्ञानानें करीत असेल, केव्हां केव्हां कामाच्या गर्दीमुळें करीत असेल, केव्हां केव्हां स्वाभाविक दुर्लक्ष होत असेल, किंवा प्राप्त वस्तूचा आदर स्वाभाविक कमी होतो, त्याप्रमाणें होत असेल; कसेंही असलें तरी तो दोषच, तो टाळण्याकरितां प्रयत्न केला पाहिजे.

४ तिच्या आंगावर मुलांचें पोषण व्हावयाचें, ह्मणून तिनें आपलें खाणेंपिणें नियमित ठेवावें; चांगलें ह्मणजे स्वच्छ व–मिळेल त्या मानानें पौष्टिक–पण पथ्यकर व प्रकृतीस मानणारें अन्न खावें, पण हा नियमितपणा ती राखीत नाहीं. वाटेल ते पदार्थ खाते, यामुळें ती मुलांचें नेहमीं नुकसान करिते व केव्हां केव्हां आपल्या स्वतांच्या प्रकृतीचेंही नुकसान करून घेते. तिला स्वतांला जे पदार्थ बाधत नाहींत, ते त्या लहान मुलांस बाधतात, हें तिच्या लक्षांत येत नाहीं. मुलांस आंगावर पाजल्यामुळें तिच्या आंगांतील रक्त कमी होतें; याकरितां जितकें रक्त कमी व्हावयाचें त्यापेक्षां अधिक तिच्या आंगांत उत्पन्न झालें पाहिजे, नाहीं तर तिची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत जाईल; याकरितां तिणें खाणेंपिणें चांगलें खावें. उपासतापास फारसे करूं नयेत. मुलांचें संगोपन तिच्या निरोगीपणावर अवलंबून आहे, याकरितां तिनें आपल्या प्रकृतीस जपावें, ह्मणजे मुलांचें संगोपन सहज होईल. तिनें आपला स्वभाव शांत ठेवावा. ती केव्हां केव्हां उगीच आकांडतांडव करिते व आपलें रक्त तापवून घेते, त्याचा परिणाम त्या कोमल अर्भकांवर फार वाईट घडतो. मुलगें रडूं लागलें तर त्यास उचलून घ्यावयाचें तें न घेतां एखादी आई उलट त्यास गालगुच्चे घेते, किंवा चापटी लगावते, हें तर फारच वाईट. **'वड्याचें तेल वांग्यांवर'** अशांतला जरी हा प्रकार घडत असला, तरीही तो वाईटच–नको–पाहिजे आईनें आपले मनोविकार कधींही क्षुब्ध होऊं देऊं नयेत. मनोविकारांचे परिणाम

आंगावर पिणाऱ्या मुलांस बाधा केल्याशिवाय राहात नाहींत. मूल आंगावर पीत आहे, तोंपर्यंत आईनें आपली प्रकृति नीट राखण्याची काळजी घेतल्यास, मुलांच्या प्रकृतीविषयीं वेगळी काळजी घेण्याचें कारण उरणार नाहीं.

५ मुलगें रडूं लागल्यास त्यास खावयास द्यावें. त्याचें पोट वगैरे दुखत असल्यास त्यास कांहीं बारीकसारीक औषध घालावें. लहान मुलांस बरेच विकार जंतांपासून होत असतात, याकरितां इतर उपचार करण्यापूर्वी जंतांवरचे उपचार प्रथम करावे. अफू वगैरे घालण्याची संवय होतां होईतों लावूं नये. तशी संवय लावल्यास त्यास पुढें अफूशिवाय चैन पडेनासें होतें, व त्यास अफूचें व्यसन आपणच लावून दिल्यासारखें होतें; तें पुढें सुटतां सुटत नाहीं, सोडूं लागल्यास मूल अधिक किरकिरें बनतें, यापेक्षां वाईट परिणाम घडण्याचाही केव्हां केव्हां संभव असतो. औषधोपचारही साधेलतों घरगुती करणें चांगलें. दिवसभर डाक्टरांचीं घरें धुंडाळणें चांगलें नाहीं. मुलगें रडतें ह्मणून त्यास खाऊ देऊन उगें करूं नये. वारंवार खाऊ मिळत गेल्यास त्यास तीच चट लागण्याचा संभव असतो, व मग तेंच कारण त्याची रड वाढवण्यास पुरेसें होतें. शिवाय त्यास जंतांचा किंवा दुसरा एखादा विकार जडण्याचाही संभव असतो. तेव्हां बारीकसारीक गोष्टींत सुद्धां मुलांस वागवतांना दक्षतेनें वागावें व प्रेम अधिक उणें होऊं देऊं नये.

६ मुलास प्यावयास द्यावयाचें तें वारंवार व अनियमितपणें घेऊं नये. नियमित वेळां व नियमित वेळ मध्यें जाऊं देऊन द्यावें. एकसारखें मुलास कुशींत घेऊन पाजीत सुटणें, किंवा आपण झोंपीं जाऊन त्यास पिऊं देणें, चांगलें नाहीं. मुलास पाजणें झाल्यास आपण उठून बसावें, त्यास पुरतें पाजावें, व मुलास थोपटून निजवून मग आपण निजावें. मुलाची जोपासना हें आईनें आपलें पहिलें काम समजावें. इतर सतरा कामें करावयाचीं व मुलास रडत टाकावयाचें, असें करूं नये. एखादें काम कमी झालें

तरी चालेल, किंवा त्यास अंमळ वेळ लागला तरी चालेल. प्रथम मुलाची योग्य तरतूद ठेवण्याची काळजी घ्यावी. घरांत दुसरीं मनुष्यें नसल्यास व मजूर ठेवण्याची ताकद नसल्यास, सर्व कामें घरांत करावीं लागतील, हें उघड आहे. पण तीं कामें आपली प्रकृति शांत ठेवून, मुलास न दुखवितां, हळूहळू करतां येतील तशीं करावीं. ज्या गोष्टींस इलाज नाहीं, त्या गोष्टींबद्दल उगीच धडपड करून रागानें आपलें शरीर जाळून घेऊं नये. आपली प्रकृति आनंदी ठेवल्यास मुलावर त्याचा सुपरिणाम घडल्याशिवाय राहणार नाहीं. मुलाचें पोट वेळच्यावेळीं भरत असलें, त्यास कांहीं इजा नसली, ह्मणजे तें रिकामी रड कधीं घेणार नाहीं. त्यास वेळच्यावेळीं खावयास मिळत असलें, ह्मणजे त्याच्या पोटांतील दुधाचें पचन नीट होईल, तें नेमलेल्या वेळीं पोटभर खाईल, त्यास झोंप चांगली येईल व तें निरोगी बनत जाईल; आईच्या आंगावर नियमित दूध सांचेल व उभयतांस नियमित वर्तनाचा धडा मिळेल.

७ आईच्या आंगावर मूल प्यावयाचें असतें. ह्मणून तिनें आपल्या प्रकृतीस जपावें, ह्मणजे त्यांत तिचें व संततीचें हित होईल. आईनें अन्न खाणें तें साधें पण स्वच्छ, मिळेल त्या बेतानें पौष्टिक, पण पथ्यकर व सहज पचणारें, खावें. कारण **'पचेल तें खावें'** या ह्मणींत पुष्कळ तथ्य आहे. चांगलें व पौष्टिक अन्न खाल्लें, पण त्याचें पचन झालें नाहीं, तर तें प्रकृतीस हितावह होणार नाहीं. आनंदानें राहावें; रिकामी काळजी करूं नये, व देवानें दिलेली अपत्यरूप अमूल्य देणगी आपणांस प्राप्त झाली आहे, याबद्दल त्याचे आभार मानून तिच्या रक्षणाकरितां अत्यंत कष्ट सोसावे; ह्मणजे त्या योगानें उभयतांस सुख व आनंद हीं प्राप्त होतील.

८ मुलांच्या आयांनीं आंगावर मूल पीत आहे तोंपर्यंत, अनेक व्रतें व उपवासासारखीं तामस कर्में, करूं नयेत. त्यांनीं आपलें मुख्य कर्तव्य–मुलांचें संगोपन–हें–समजावें, ह्मणजे त्यांस अनेक व्रतांचें पुण्य लागेल.

९ लहान मुलांस दुखणें आल्यास आईबापांस फार कष्ट सोसावे लागतात. मुलें त्रास देतात, किरकिर करितात, पण आईबापांनीं मन शांत ठेवून त्यांची निगा करावी. आई जपून वागल्यास मुलांस फारसें दुखणें येणार नाहीं. बारीकसारीक दुखणें त्यांस विश्रांति दिल्यानें व थोड्याबहुत निगेनें किंवा साधारण औषधानें बरें होईल. तसें न झाल्यास अनुभविक वैद्याची किंवा डाक्तराची मदत घ्यावी.

१० मुलांस प्रेमानें वागवावें, उगीच त्रास देऊं नये, ही मुख्य गोष्ट. पण त्यांस चांगल्या मार्गास लावण्याचे प्रयत्न अगदीं लहानपणापासून करावे. वाईट संवय लागण्यास वेळ लागणार नाहीं. एकदा वाईट संवय लागल्यावर ती बळावत जाते, मग तिचाच दुर्गुण बनतो. याकरितां प्रथमपासूनच वाईट संवय लागू नये ह्मणून जपत असावें. कठोर उपाय एकदम योजूं नयेत. सौम्य उपायांचा स्वीकार करावा. प्रेम, प्रसंगाप्रमाणें कमीजास्त दाखवल्यास, बरेंच काम साधेल.

११ मुलाच्या साधारण प्रवृत्तीस विनाकारण आड येऊं नये. परंतु तिच्यापासून दुर्गुण उत्पन्न होण्याचा संभव दिसल्यास तिचा प्रतिकार अवश्य करावा. मुलाच्या प्रवृत्तीस आपण निष्कारण आड आल्यास मुलगें उलट स्वभावाचें बनण्याचा पुष्कळ वेळां संभव असतो. हें एखादें बारीकसें उदाहरण पाहिल्यानेंही लक्षांत येण्यासारखें आहे. मूल रांगू लागलें, ह्मणजे तें प्रथम घरांतील सपाट जागेवर रांगूं लागतें. थोड्या वेळानें उंबरठे वलांडूं लागतें, व शेवटीं पायऱ्या उतरून पलीकडे जाऊं लागतें. अशा वेळीं त्याच्यावर लक्ष ठेवण्यास मनुष्य असण्याची जरूरी असते. पण मूल पायऱ्यांशीं गेल्यावर, एखादी आई जर त्यास तेथून उचलून मागें आणून ठेवूं लागली, तर जसा—आघाताच्या प्रमाणांत प्रत्याघात होतो—त्याप्रमाणें—मूल लागलेंच फिरून पायऱ्यांच्या टोंकावर रांगत जाईल, व पायऱ्या उतरण्याचा प्रयत्न करूं लागेल. जों जों आपण त्यास अडथळा अधिक करूं, तों तों तेंही अधिक हट्टानें आपला

क्रम सोडणार नाहीं. फार त्रास झाला तर तें रडूं लागेल. पण आपण त्यास न उचलतां किंवा अडथळा न करितां पायऱ्यांवर जाऊं दिलें, तर तें मूल न पडतां बहुधा पायऱ्या उतरून जाईल; नाहीं तर तेथून परत फिरेल. कधीं कधीं तें पडण्याचा संभव असतो, याकरितां आपण जवळ राहून त्यास मदत करण्यास तयार असावें. तें आपला मार्ग बहुधा सावधपणानें क्रमीत असतें, असा पुष्कळ वेळां अनुभव येतो. याकरितां आपण त्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीस बहुधा आड येऊं नये. त्याच्या जवळ असावें, व प्रसंग पडल्यास त्यास मदत करावी.

१२ एखादी तापट आई असली ह्मणजे ती मुलास तोंडानें उगाच अपशब्द बोलते, त्यास मागें आणून आपटते, किंवा त्या कोमल अर्भकास उगीच एखादी चापटी लगावते! यापैकीं कांहीं झालें, तरी तें फार वाईट. लहान मुलांची हुरूप जबर असते. तीं नेहमीं नवीन व्यवसाय करीत असतात. दुनियेंतील पदार्थांचा अनुभव घेत असतात. आपली शक्ति अजमावून पाहात असतात. त्यांस रागाचें व लोभाचें कारण बरोबर समजण्याचें ज्ञान नसतें, याकरितां त्यांस त्रास देणें निरुपयोगी असतें. ह्मणून त्यांस रिकामा अडथळा करूं नये, दटाऊं नये, भीति दाखवूं नये, किंवा विनाकारण चापट मारूं नये. अपाय घडण्याचा संभव दिसल्यास मदत करण्यास मात्र तयार असावें.

१३ मुलें एका जागीं बसतात, तेव्हां त्यांनीं फिरावें, असें आईबापांस वाटतें; पण तीं फिरूं लागलीं, त्यांस आटपतां आटपतां पुरेसें होऊं लागलें, ह्मणजे तेंही त्यांस सहन होत नाहींसें होतें! मुलें उभीं राहण्याच्या आधीं उभीं करणें, बसण्याच्या पूर्वीं त्यांस बसावयास लावणें, चालूं लागण्याच्या पूर्वीं त्यांस बुद्ध्या चालवणें, या गोष्टींची कित्येक आईबापांस मोठी आवड असते; पण या सर्व गोष्टी जशा वाईट आहेत, तशाच तीं धांवूं पळूं लागल्यावर त्यांस धांवण्यापळण्याची मनाई करणें, एका ठिकाणीं आग्रहानें बसवणें, झोंप येत नसतां निजविणें, निजलेलीं असल्यास

आपल्या सोईकरितां जागीं करणें, किंवा झोंप मोडून भरवावयास लावणें, ह्या सर्व चाली सारख्याच वाईट आहेत, ह्या टाळवतील तेवढ्या टाळाव्या.

१४ मुलें लहान असतांना त्यांस आईबापांचा राग आपल्यावर कां झाला, याचें कारण कळणें कठीण असतें. याकरितां त्यांस तसें कळूं लागेपर्यंत त्यांच्यावर रागावूं नये, हें चांगलें. आईबापांच्या असल्या वागणुकीचा–उगीचच्या उगीच रागावण्याचा–किंवा चापट लगावण्याचा, परिणाम मुलांवर अगदींच घडत नसेल, असें ह्मणवत नाहीं, पण तो इष्ट परिणाम नसतो, यांत मात्र संशय नाहीं. आईबापांच्या दरडावणीनें मूल भितें, व तें रडावयास लागतें. पण तें आपलें काम–खोड्या करण्याचें–सोडून देतें, असें मात्र आढळत नाहीं. याकरितां या वयांत त्यांस रिकामा त्रास देऊं नये. त्यांस उद्योग करावा किंवा उलाढाल करावी, इतकें मात्र समजत असतें व त्याप्रमाणें तें एकसारखें वापरत असतें. आपल्या वापरण्याचा परिणाम काय घडेल इकडे त्याचें लक्ष नसतें, किंवा त्याबद्दल त्याला ज्ञान नसतें. त्याचा प्रत्येक प्रयत्न घरांतल्या माणसांना नावडणाराच असतो; कारण त्यापासून घरांतल्या माणसांचें काम वाढत असतें, पण त्याला त्या अर्भकाचा कांहीं इलाज नसतो. एखादी वस्तु आढळली ह्मणजे ती तें तोंडांत घालणार; मग ती तोंडांत घालण्यासारखी असो वा नसो; ती तोंडांत घातल्यापासून अपकार होवो किंवा उपकार होवो; वस्तु बिघडो किंवा खराब होवो; त्याचा विचार त्यास नसतो. त्याला कळत नाहीं, ह्मणून त्यावर रागावण्यांत अर्थ नाहीं. भलती वस्तु त्याच्या हातास लागूं नये, ह्मणून योग्य ती खबरदारी आईबापांनीं प्रथमच ठेवावी, हें बरें.

१५ मुलें जसजशीं वाढत जातात, तसतशीं तीं वेगळ्या वेगळ्या खोड्या करतात, तरी त्यांत त्यांचा वावगा हेतु कांहीं नसतो. दृष्टीस पडणाऱ्या पदार्थांपासून मिळणारें स्वाभाविक ज्ञान मिळवावें, एवढाच त्यांचा हेतु असतो. एखादी वस्तु हातांत मिळाली कीं ती

आपटावी, फोडून टाकावी, उडवून द्यावी; पाणी उपडें करावें, थापटीत बसावें, कपडे भिजवून घ्यावे; जळतें लांकूड चुलींतून ओढावें, हात भाजून घ्यावा, कपडे पेटवून घ्यावे; असल्या अनेक खोड्या करून आपल्यास इजा करून घ्यावी; एखाद्या वस्तूचा नाश करावा, वडील मनुष्यांच्या कामांत नसते उद्योग करून भर घालावी; असें एकसारखें चाललें असतें, तरी एकसारखें रावत असण्याखेरीज दुसरा कोणताही हेतु त्यांच्या मनांत नसतो. वडील माणसांस मुलांच्या या खोड्यांपासून पुष्कळ त्रास सोसावा लागतो. परंतु मुलांच्या अज्ञानावर लक्ष देऊन, आईबापांनीं त्यांस उगीच रागावूं नये. कांहीं नुकसान झाल्यास शांतपणानें तें सोसावें, व मुलांस होणाऱ्या अपायांस योग्य उपचार करावे. मुलें रांगूं लागल्यावर किंवा वावरूं लागल्यावर त्यांच्यावर थोडें अधिक लक्ष ठेवल्यास, त्यांतले बरेचसे अपाय टाळतां येतील; व त्यांस थोडेसें ज्ञान प्राप्त झाल्यावर, या त्यांच्या खोड्यांस हस्तव्यवसायांचें रूप देऊन, त्यांस अनेक प्रकारचें शिक्षण देतां येईल.

१६ मुलें अंमळशीं मोठीं झालीं, त्यांस आईबापांचे रागद्वेष समजूं लागले, म्हणजे आपलें बरेंच काम–एखाद्या गोष्टीबद्दल आपला रागद्वेष त्यांस दाखवण्यानेंच–भागूं लागेल. असें जेवढें भागवितां येईल तेवढें चांगलें. **'ऊठसोट्या तुझें राज्य'** असें आतां कोणी फारसें करीत नाहीं, पण माराची रिकामी धमकी देणें किंवा एखादी चापटी लगावणें हेंही बरें नाहीं. योग्य वेळीं तीच गोष्ट मोठें काम करील. याकरितां सारासार विचार नेहमीं करावा. मुलांस वाईट शब्द बोलूं नयेत, नाहीं तर बोलावयास येऊं लागल्याबरोबर तीं त्यांचेंच अनुकरण करतील. वाईट शब्द कानावर येऊं लागल्यास—दर्पणासमोर असणारी वस्तु जशी त्यांत प्रतिबिंबित होते, अथवा ध्वनीचा प्रतिध्वनि अनुकूल स्थळीं जसा ताबडतोब उमटतो, त्याप्रमाणें—वाईट शब्दांचा अनुकरणविधि आपल्या लागलाच प्रत्ययास येईल; याकरितां अपशब्द बोलण्याचें टाळावें. आपल्या रागद्वेषांच्या दर्शनानें त्यांस चांगल्याची प्रीति व वाइटाचा

द्वेष उत्पन्न होईल, असा प्रयत्न निरंतर चालवावा. आपण जरी वाईट शब्द उच्चारले नाहींत, तरी भोंवतालच्या मनुष्यांच्या सहवासानें तीं वाईट शब्द शिकतील; पण ते आपणांस आवडत नाहींत, असें आपण त्यांस दाखवल्यास, ते त्या मार्गापासून परावृत्त होतील. वाईट शब्द न उच्चारणें, हें वाचिक तप आहे. तें आपल्यास सहज साधून, त्यापासून आपल्या संततीचेंही हित होईल.

१७ संततीच्या चांगल्या मनोवृत्तींस वळण मिळावें, वाईट मनोवृत्ति मुळाशींच सुकाव्या, अशी योजना करावी. एकसारखें मुलांस मारणें, किंवा त्यांच्यांतील कमतरपणाबद्दल त्यांस हिणावणें, त्यांस कांहीं कळत नाहीं, असें वारंवार ह्मणणें, चांगलें नाहीं. कारण त्यापासून पुष्कळ वेळां त्यांची नाउमेद होते व उत्साह नाहींसा होतो. स्वाभाविक कमतरपणास कोणाचाच इलाज नाहीं. त्यावर टीका करण्यांत अर्थ नाहीं. ज्या गोष्टींत सुधारणा होण्यासारखी असेल, त्या गोष्टीबद्दल प्रयत्न करावयाचा. टोंचून बोलण्यापेक्षां ममतेनें बोलावें. प्रोत्साहन देऊन विशिष्ट वळण त्यांस लावण्याचा प्रयत्न करावा.

१८ मुलांवर दाब असावा हें खरें आहे, पण तो दाब आपल्या सद्वर्तनाचा असावा. दाब ह्मणजे भीति नव्हे. वाघ एकदा ओरडला ह्मणजे वनपशु अगदीं गुपचुप बसतात. पण वाघ व वनपशु यांचा संबंध प्रेमाचा नसतो. आईबापांस पाहून मुलांस अशी भीति वाटत असल्यास, असा दाब कांहीं उपयोगाचा नाहीं. तो हितपरिणामी होणार नाहीं. तो दाब आईबापांच्या दृष्टीसमोर किंवा गर्जनेपुरता मात्र राहील. मुलांवर दाब ठेवणें ह्मणजे मुलांस काचांत ठेवणें नव्हे. आईबापांस पाहिल्याबरोबर मुलांस आनंदाचें भरतें आलें पाहिजे, व मुलांच्या हातून कांहीं वाईट काम घडलें असल्यास, आईबापांच्यापुढें येतांना त्यांच्या माना लाजेनें खालीं झाल्या पाहिजेत. एरव्हीं त्यांचे चेहरे प्रफुल्ल असले पाहिजेत, त्यांच्या ठिकाणीं सद्विचारांचा उदय झाला पाहिजे व वाईट विकार आईबापांच्या दर्शनानें पार मावळून गेले पाहिजेत.

१९ मुलांस निष्कारण त्रास केव्हांही देऊं नये. कारण आई-बाप आपल्यास उगीच त्रास देतात, अशी मुलांची भावना झाल्यास, तीं त्यांस उगीच त्रास देऊं लागतात. यामुळें बारीकसारीक कामांत सुद्धां रिकामें द्वैत वाढत जातें व एकाचें तोंड उत्तरेस तर दुसऱ्याचें दक्षिणेस असें होण्याचा प्रसंग येतो, असें दिसल्यास आपण त्या गोष्टीबद्दल आपला तिरस्कार दाखवावा, गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न करावा, वृथा वाद वाढवूं नये, ह्मणजे मुलांच्या स्वभावांत बहुधा बदल होईल. योग्य वेळीं केलेले प्रयत्न फुकट जाणार नाहींत, मात्र रागाच्या स्वाधीन होऊन भलती किंवा जबर शिक्षा सहसा करूं नये.

२० एखादा मुलगा जेवायास योग्य वेळीं येत नसला, तर आईनें चरफडून किंवा अपशब्द बोलून आपल्या मनास उगीच त्रास करून घेऊं नये, किंवा मुलाशीं हातपिटीस येऊं नये. योग्य वेळीं न आल्यास कांहीं तरी तोटा होतो, असें त्याच्या प्रत्ययास आणून द्यावें, ह्मणजे योग्य वेळीं येण्यास तो चुकणार नाहीं. लहान मुलास आई भरविते, त्याप्रमाणें मध्यम वयाच्या मुलासही भरविते, पण लहान मुलास केवळ त्याच्या कलाप्रमाणें वागून **'काऊ काऊ चिऊ चिऊ'** करून जेवण घालते, त्याप्रमाणें मध्यम वयाच्या मुलास घालूं नये. तो आपल्या कलाप्रमाणें वागेल, आपलें ह्मणणें ऐकेल, तर त्यास भरवावें, अव्यवस्थित वागेल तर भरवूं नये. ह्मणजे वेळच्या-वेळीं येण्यास त्यास एवढेंही औषध पुरेंसें होईल. अयोग्य वेळीं आल्यास आई भरवीत नाहीं, किंवा आपलें पान आपल्यास मांडून घ्यावें लागतें, किंवा उष्टें काढावें लागतें, असें त्यास कळलें, ह्मणजे याच गोष्टी त्याच्या अनियमित वर्तनास आळा घालण्यास उपयोगीं पडतील. मुलगा मोठा असून तो नियमित वेळीं येत नसला, तर त्याच्याकरितां इतर मंडळीनें खोळंबूं नये. एखादे वेळीं थोडी वाट पाहावी, त्यास ताकीद द्यावी, ह्मणजे तो ताळ्यावर येईल. योग्य कारण नसेल तर वाट पाहाण्याचें कारण नाहीं. आपलीं जेवणें आटोपून घ्यावीं. मुलास जेवणाचा फांका बसला, निवालेलें जेवण

मिळालें, एकटेंच जेवावें लागलें, ह्मणजे आपण केलेल्या अपराधाबद्दल ही योग्य शिक्षा आपल्यास मिळाली, असें त्यास वाटल्याशिवाय राहाणार नाहीं, व त्याच्यावर या गोष्टीमुळें योग्य तो परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाहीं; ह्मणजे वेडेवांकडे शब्द उच्चारण्याचें सहजच टाळितां येईल. **'शहाण्यास मार शब्दांचा'** अशी ह्मण आहे. पण आपण आपल्या वृत्तीचा नीट उपयोग केल्यास, शब्द उच्चारल्याशिवायही पुष्कळ काम साधितां येईल. आपले बहुमोल शब्द आपण वृथा खर्च कां करावे ? सर्कशींतील प्रोफेसरही—मुक्या प्राण्यांनां—घोड्यासारख्या जनावरांनां—नुसत्या चावुकाच्या इशारतीनें, वाटेल तसें फिरावयास लावतो, मग आईबापांस आपल्या इंगीतज्ञ संततीस, दृष्टीच्या इशाऱ्यानें सद्गुण लावण्यास कां अडचण येईल ?

२१ एखाद्या मुलास दिलेली वस्तु त्यानें हरविली, अलगर्जीपणानें हरविली, तर त्यास नवीन वस्तु लागलीच घेऊन देऊं नये. त्या वस्तूवांचून आपलें किती अडतें, ही अडचण आपण आपल्या अलगर्जीपणानें उत्पन्न केली, असें त्यास कळलें पाहिजे. पैसा मिळवण्यास फार श्रम लागतात, ह्मणून त्याचा खर्च बेताबातानें केला पाहिजे, अलगर्जीपणा चांगला नाहीं, इत्यादि गोष्टींचा चांगला ठसा त्याच्या मनावर उठल्यावर, मग त्यास दुसरी वस्तु घेऊन द्यावी, ह्मणजे तो आपला निष्काळजीपणा टाकील व आपल्या वस्तूस जपूं लागेल. एक सांडल्यावर दुसरी वस्तु लागलीच मिळाल्यास, तिची किंमत त्यास कळणार नाहीं, वस्तु हरवल्याबद्दल त्यास वाईट वाटणार नाहीं, त्याच्या दुर्गुणांत कदाचित भर पडेल, व त्यास चांगलें वळण लागणार नाहीं.

२२ अशा सामान्य गोष्टींकडे आईबाप पुष्कळ वेळां दुर्लक्ष करतात; त्यामुळें त्यांचीं मुलें हळू हळू बेफाम बनतात, व आईबापांस पुसतनाशीं होतात. तीं डोकीवर बसल्यावर आईबापांस आपली चूक कळते, पण मग त्याचा उपयोग बिलकूल होत नाहीं.

२३ एका मुलाचा बाप अशाप्रकारें मुलगा बिघडला असतां, त्याबद्दल मजजवळ गाऱ्हाणें सांगूं लागला:—"या मुलाचें कोठें जमत नाहीं. यास कोठें ठेवल्यास हा तेथें नीट राहात नाहीं, तंटेबखेडे करतो, व फिरून घरीं निघून येतो. यामुळें या मुलाची मला मोठी काळजी लागली आहे. तुम्ही मेहेरबानी करून या मुलास आपल्या बरोबर नेल्यास माझ्यावर तुमचे मोठे उपकार होतील." हें ऐकून मी त्या मुलाकडे पाहिलें. व "तूं माझ्याबरोबर येण्यास कबूल आहेस काय ?" असें त्यास विचारलें. त्यानें येण्याचें कबूल केलें, ह्मणून त्यास मी आपल्या बरोबर घेतलें.

२४ तो आईबापांचा एकुलता एक मुलगा होता, ह्मणून त्यास पोंचवण्याकरितां बाप मजबरोबर आला. पावसाळा जवळ आला होता, ह्मणून मुलास छत्री घेऊन देणें जरूर होतें. बापानें मला विचारलें. 'एक सिंगापुरी छत्री घेऊन द्यावी' असें मीं सांगितलें. मुलगा 'विलायती पाहिजे' असें ह्मणत होता. बापानें सिंगापुरी छत्री घेऊन दिली. मुलानें ती छत्री–बाप तेथें आहे तोंच–एका दिवसांत मोडून टाकली, व बापाजवळ विलायती छत्री घेऊन देण्याबद्दल हट्ट चालविला. बापानें दुप्पट पैसे खर्च करून, त्यास विलायती छत्री घेऊन दिली. हें पाहून मला आश्चर्य वाटलें. बापास पगार आठ रुपये मिळत असे. नवराबायको व तीन मुलें यांचें त्या पगारांत त्यास पोषण करावें लागे. असें असून मुलाचे लाड–मूर्खपणाचे लाड–पुरवण्याकरितां बापानें दोन दिवसांत दीड रुपया खर्च केला, हें लहान आश्चर्य काय ! यापेक्षां आदल्या दिवशीं मुलाच्या हेक्याप्रमाणें एक रुपया खर्च केला असता, तरी बरें झालें असतें ! मुलें आपल्या कह्यांत राहात नाहींत असें ह्मणून हाका मारावयाच्या, पण आपल्या कृतीनें–न समजून कां होईना–त्यांच्या दुर्वृत्तपणाला मदत करावयाची, याला काय ह्मणावें ? अशानें मुलें बिघडतील, नाहींतर तीं का ताळ्यावर येतील ?

२५ मुलास एक छत्री घेऊन दिली होती, ती एक वर्ष टिकवणें

हें त्याचें काम होतें. निदान पहिली वापरून, योग्यवेळीं फाटली म्हणून दुसरी घेऊन दिली असती, तर गोष्ट वेगळी; पण तसें कांहीं कारण नसतां त्यानें ती दांडगाईनें मोडून टाकली, तर त्यास नवीन छत्री घेऊन देणें वाजवी नव्हतें; त्यास छत्रीची उणीव कळणें जरूर होतें; त्यास त्याच्या अपराधाबद्दल शासन मिळणें जरूर होतें. छत्री नसल्यामुळें किती अडचणी उत्पन्न होतात, चांगल्या वस्तूचा आपण बुध्या नाश केला हें किती गैरशिस्त केलें, ह्या गोष्टी त्यास कळणें जरूर होतें. मोठी छत्री–पहिल्यापेक्षां अधिक मोठी व सुरेख–घेऊन दिल्यावर या गोष्टी कशा कळणार ? उलट त्याच्या दांडगाईस उत्तेजन येण्यास मात्र या कृत्याचा उपयोग झाला. मोठ्या किमतीच्या छत्रींत–केवळ शोभेशिवाय किंवा नोकझोंकाशिवाय–काय अधिक आहे! **'हांतरूण पाहून पाय पसरणें'** किती अगत्याचें आहे, एका मुलाच्या हौशीकरितां–किंवा हट्टाकरतां–चार माणसांचें अन्न व्यर्थ घालवणें किती मूर्खपणाचें आहे, हें मुलास कळावयास पाहिजे होतें; तें सारें एकीकडे राहून, बापाच्या फाजील लाडामुळें, मुलावर किती वाईट परिणाम घडले पाहा ! आपला इच्छित हेतु–तो अयोग्य असतां–तडीस नेण्याकरितां मुलानें नवी छत्री एका दिवसांत मोडली; बापाचा दुप्पट पैसा व्यर्थ घालविला; आपल्याला अव्यवस्थितपणाची संवय लावून घेतली; वडील मनुष्यांची पर्यायानें अवज्ञा केली; याकरितां असल्या फाजील–वेड्या–प्रेमाच्या भरांत सांपडून, आईबापांनीं भलत्याच गोष्टींत मुलांचे हट्ट चालू देणें वाजवी नाहीं.

२६ मुलांस चांगलें कोणतें व वाईट कोणतें हें कळावें, चांगल्या गोष्टींकडे त्यांचें लक्ष लागावें, व वाईट गोष्टींकडे त्यांचें लक्ष लागूं नये, आपल्या प्रेमाचा उपयोग त्यांच्या हिताकडे व्हावा, अहिताकडे होऊं नये, हें लक्षांत ठेवून आईबापांनीं मुलांवर प्रेम करावें. मुलांवर उगीच रागावूं नये, त्याप्रमाणें वेडें प्रेम पण करूं नये.

२७ वर ज्या मुलाची गोष्ट सांगितली, त्या मुलास बापाच्या

फाजील लाडामुळें इतकें वाईट वळण लागलें होतें कीं, तो मुलगा कोणासही खपेनासा झाला होता. बरोबरीच्या मुलांत जावो, लहानांत जावो, मोठ्यांत जावो, बायकांत जावो किंवा पुरुषांत जावो; जाईल तेथें कज्जाभांडण केल्याशिवाय तो राहावयाचा नाहीं, असा त्याचा स्वभाव बनला होता. त्यास ताळ्यावर आणण्याकरितां मला अनेक प्रयत्न करावे लागले, व शेवटीं त्यास दोन वेळ जबर शिक्षाही करावी लागली. बापाचें वर्तन आरंभापासून शिस्तीचें नसल्यामुळें, त्या मुलास ताळयावर आणण्यास फार कष्ट पडले.

२८ मुलांच्या मनांत वेगळ्या वेगळ्या वेळीं वेगळेवेगळे मनोभाव उत्पन्न होत असतात. त्यांतून चांगले ते वाढीस लागावे, व वाईट ते नाश पावावे, याकरितां आईबापांनीं प्रयत्न करावे; त्याकरितां त्यांनीं प्रथम सौम्य उपायांचें अवलंबन करावें, कठोरपणा बहुधा करूं नये. प्रथमच जालीम मात्रेचा उपयोग केल्यास पुढें ती मात्राही पचनीं पडून, रोगावर उपयोगीं पडेनाशी होते; त्याप्रमाणें प्रथमपासून मारण्याची शिक्षा करणाऱ्या आईबापांस, ती शिक्षा वेळेवर हात देईनाशी होते. उपदेशानें व उदाहरणांनीं पुष्कळ गोष्टी सांगण्यासारख्या असतात. संसारांत अनेकविध उत्पन्न होणारे प्रसंग आईबापांनीं फुकट जाऊं देऊं नयेत, व त्यांच्यापासून योग्य वेळीं जो बोध घेण्यासारखा असेल, तो मुलांस दाखवून देण्यास चुकूं नये. अनेक पुस्तकांत अनेक उपयुक्त व बोधपर गोष्टी लिहिलेल्या असतात, त्यांचाही प्रसंगीं होईल तितका उपयोग करीत असावें. ह्मणजे मुलांस चांगल्या रीती लावण्यास त्यांचा मोठा उपयोग होईल.

२९ **'जो गुण बाळा तो जन्मकाळा'** ह्मणजे लहानपणीं मुलांस कोणतेंही वळण लौकर लावितां येतें, व तें आमरण टिकतें. याकरितां चांगलें वळण लावण्याचे प्रयत्न बाळपणांत करावे, व वाईट संवय लागूं नये ह्मणून प्रथमपासून जपावें.

३० मुलांची जिज्ञासा लहानपणीं फार प्रखर असते. एखादा चांगलासा धोंडा, झाडाचें सुरेखसें पान, किंवा गवताची चमत्का-

रिक काडी, हींही त्यांच्या करमणुकीचीं साधनें होऊं शकतात. यामुळें असले पदार्थ दृष्टीस पडल्यास, मुलें ते सहज उचलतात. ते चोरावे अशी त्यांची इच्छा नसते, पण ते जवळ असावे, असें त्यांस वाटत असतें. याकरितां अशा वस्तु त्यांच्याजवळ आढळल्यास त्या काय आहेत, कोणाच्या आहेत, त्यांच्याजवळ कशा आल्या, याची चौकशी करावी; व त्या दुसऱ्या कोणाच्या असल्यास ज्यांच्या त्यांस देऊन टाकण्यास त्यांस सांगावें, किंवा आपण देऊन टाकाव्या. प्रथमच मुलांस तें पटणार नाहीं, पण वारंवार सांगत गेल्यास त्याचा परिणाम त्यांच्या मनावर झाल्याशिवाय राहणार नाहीं. आग्रह न करितां, किंवा मुलांस विशेष न दुखवितां, नुसत्या उपदेशानें—**दुसऱ्याची वस्तु त्यास विचारल्याशिवाय घेऊं नये**—हें तत्व मुलांस शिकवितां येईल. परंतु इकडे आपण दुर्लक्ष केल्यास त्यांस दुसऱ्याची वस्तु उचलण्याची संवय लागून, हाताळपणाचा दुर्गुण त्यांच्यांत उत्पन्न होईल. जें शिक्षण त्यांस द्यावयाचें, ज्या चालीरीती त्यांस लावावयाच्या, त्या नेहमींच्या वर्तनांतील गुणदोष दाखवून व आपलें वर्तन योग्य ठेवून, त्यांस लावण्याचा प्रयत्न करावा. मुलांशीं आपली वागणूक प्रेमाची असली, ह्मणजे आपण त्यांस एखादे दिवशीं कमी प्रेम दाखवल्यास तेवढें शासन त्यांस पुरेसें होतें. नेहमीं तंबाखू खाणारास तंबाखूचा औषधासारखा उपयोग होत नाहीं, त्याप्रमाणें नेहमीं रागावणारास त्याच्या रागाचा उपयोग होत नाहीं. नेहमीं मारणाराचा धाक मुलांस वाटत नाहीं, त्याप्रमाणें नेहमीं रागावणाराच्या रागास कोणी विचारीत नाहीं. कित्येक आईबापांस मुलांशीं नेहमीं धुसफुस करण्याची संवय असते, पण ती अगदीं वाईट. त्या संवईपासून आईबापांस सुख होत नाहीं, व संततीसही सुख होत नाहीं. मुलें नेहमीं दुर्मुखलेलीं, तिरसट, किरकिरीं, अशीं होतात, व आईबापांच्या कपाळाच्या आंठ्या कधीं नाहींशा होत नाहींत.

२१ तिरसटपणानें जें काम होत नाहीं, तें प्रेमानें होतें. मुलांस

चरफडण्याचें कारण कळत नाहीं, तोंपर्यंत चरफडण्याचा उपयोग होत नाहीं; व कारण कळूं लागल्यावर चरफडण्याशिवाय भागण्यासारखें असतें. याकरितां होतां होईतों तिरसटपणा न करितां, प्रेमानेंच सर्व गोष्टी साधण्याचा प्रयत्न करावा. आपण आपल्या मुलांशीं धुसफुस सुरू केल्यास, तीं तरी शांत कशीं बनतील! जें काम चापव्या लगावून किंवा वाईट शब्द बोलून, अथवा रिकामी गर्जना करून, कित्येक आईबाप करतात; तेंच काम प्रेमळ आईबाप आपल्या अपत्यांकडे एकप्रकारच्या प्रेमळ दृष्टीनें पाहून किंवा वेळेवर प्रेमशुष्क व करड्या दृष्टीनें पाहून, तडीस लावितात.

३२ गोड शब्दांनीं जें काम होण्यासारखें असेल, त्या ठिकाणीं कठोर शब्दांचा प्रयोग करूं नये. नुसत्या वक्रदृष्टीनें ज्या ठिकाणीं काम होण्यासारखें असेल, तेथें कुशब्दांचा वर्षाव किंवा छड्यांचा छमछमाट चालवूं नये; पण या प्रयत्नांचा उपयोग होत नसेल तर देहदंड करण्यास भिऊं नये. कारण चांगल्या रीतिभाती मुलांस लागाव्या, हें आपलें साध्य आहे. तें साधण्याकरितां जरूर तर–मोठ्या कष्टानें–आपण देहदंड करण्यास तयार व्हावें. केवळ शस्त्रसंन्यास करून नेहमींच चालणार नाहीं, पण ती गोष्ट–देहदंड करण्याची–निरुपायानें स्वीकारावी, आनंदानें स्वीकारूं नये.

३३ प्रेम ही एक अजब वस्तु आहे. पण ती अमूर्त आहे. आपण दुसऱ्यावर प्रेम केल्यास तो आपल्यावर सहज प्रेम करूं लागतो. पण दोघांपैकीं एकानेंही त्याची लागवड न केल्यास तें मुळीं मूळच धरीत नाहीं. प्रेम करावयाचें ह्मणजे तें केल्यापासून आपल्यास कांहीं खर्च होत नाहीं, किंवा त्याच्या खर्चानें प्रेमाच्या भांडवलांत कांहीं कमीपणा येत नाहीं. प्रेमाचा मोबदला आपल्यास प्रेमांत मिळाल्याशिवाय राहावयाचा नाहीं, पण न मिळाला तरी आपण त्याबद्दल उतावळें होऊं नये. मोबदल्याकडे लक्ष न दिल्यास तें अधिक चांगलें. मोबदल्याची इच्छा नसली, ह्मणजे प्रेमाच्या सवाईनें मोबदला मिळतो, असें आपल्या अनुभवास येईल.

३४ आपण संततीवर प्रेम केल्यास, संततीच्या मनांत प्रेम उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. प्रेमाचा आरंभ आई-बापांनीं करावा, हें विहित आहे; व तें वाढीसही त्यांनींच लावावें. प्रेमाचें वर्णन संस्कृत व इंग्रजी ग्रंथांतही पुष्कळ केलें आहे. कवींचें तर तें दैवतच आहे. संस्कृतांतील मासला पाहाः— **'सखि साहजिकं प्रेम दूरादपि विराजते'** प्रेमाला वस्तु जवळ असावी लागत नाहीं. ती दूर असली तरी प्रेमाला अडचण येत नाहीं. तसेंच आईबापांचें मुलांवर किती प्रेम असतें हें **'न चापत्यसमः स्नेहः'** अपत्यासारखा स्नेह नाहीं, या वाक्यावरून उघड होण्यासारखें आहे. मनुष्याचें आपल्या अपत्यावर प्रेम फार असतें, ह्मणून तर प्रत्येकाला आपलें अपत्य कसेंही असलें तरी, तें सुंदर वाटतें. प्रेमानें वस्तूला नवें रूप प्राप्त होतें. **'अमृतं बालभाषणं'** याचें कारण तरी प्रेमच. अपत्यांवर आपलें जें प्रेम असतें, तें इतकें अनिवार असतें कीं, मुलांचें भाषण कसेंही असो, तें आपल्यास गोड वाटतें. याकरितां आपण आपल्या मुलांशीं वागतांना प्रेमाची वागणूक ठेवावी.

३५ आतां एका इंग्रजी पुस्तकांतील प्रेमवर्णनाचा मासला पाहाः—"प्रेमानें मनुष्यांचीं मनें निर्मळ होऊन तीं एकत्र जमतात. त्यांची कठोर वृत्ति नाहींशी होऊन तीं एकमेकांवर ममता करतात. शत्रुत्व नष्ट होऊन तीं मित्र होतात. प्रेम हा सज्जनांचा आनंद, शहाण्यांचें नवल, व देवांचें कौतुक होय. तें सर्वांस हवेंसें असून साध्य झालें ह्मणजे मोलानें आगळें भासतें. प्रेम हें कोमलता, मार्दव, आराम, इच्छा, ममता, व सौंदर्य या गुणांचें जनक होय. जेवढें चांगलें तेवढें घेऊन, प्रेम वाइटाचा त्याग करितें. प्रत्येक भाषणांत, कृतींत, इच्छेंत, तें आपला मार्गदर्शक होऊन, आपलें संरक्षण करितें. तें देवांचें व मनुष्यांचें वैभव असून, आपलें सर्वांचें मार्गदर्शक असतें. त्यानें दाखविलेल्या मार्गानें सर्वांनीं जावें हें इष्ट होय."

कर्तव्यसुख—पृष्ठ २००

३६ मुलांस वागवितांना आपण हीच गोष्ट मुख्य लक्षांत ठेवावी. मुलें आपणांस प्रेम करण्याकरितां मिळालीं आहेत. तीं ईश्वराची अमूल्य देणगी आहे. ज्यांस मुलें नसतात, त्यांस संसार असार भासतो. मग ज्यांस तीं ईश्वराच्या कृपेनें मिळालीं आहेत, त्यांनीं त्यांवर प्रेम कां करूं नये? त्यांच्यावर प्रेम केल्यानें, वरील उताऱ्यांत सांगितलेल्या असंख्य गोष्टींचा लाभ आपणांस सहज होईल व आपल्यावर ईश्वराची कृपाही सहज होईल. मुलांचे दुर्गुण झाडून टाकण्यास, होईल तेवढा प्रेमाचा उपयोग आपण करावा.

३७ त्यांस प्रेमळ बनवितां येईल तितकें चांगलें. कारण तीं जगांत प्रेमाची वृद्धि करणारीं व्हावीं, हें सगळ्यांच्या हिताचें आहे. निरुपाय झाल्यास त्यांजवर रागवावें व देहदंडही करावा, पण तो कशाकरितां, तर केवळ प्रेमतरूची लागवड करण्याकरितां. जमीन भाजल्यावर सुपीक होते, त्याप्रमाणें योग्यवेळीं दाखविलेला राग किंवा केलेली शिक्षा, मुलांच्या अंतःकरणांत प्रेमतरूची लागवड करण्यास उपयोगीं पडेल. त्यांस समजत नाहीं, असें आढळल्यास, त्यांच्याबद्दल आपल्यास अधिक दया आली पाहिजे, अधिक वाईट वाटलें पाहिजे, व त्यांच्यावर अधिक प्रेमदृष्टि ठेवून, त्यांस शिकवण्याकरितां अधिक कष्ट करण्याकडे आपली प्रवृत्ति झाली पाहिजे.

३८ आपल्या प्रेमास तीं कशीं पात्र होतील, राष्ट्राच्या प्रेमास तीं कशीं पात्र होतील, व अखेर जगन्नियंत्या मंगलधाम ईश्वराच्या प्रेमास तीं कशीं पात्र होतील, या गोष्टींचा विचार करून, प्रेमळ वागणूक ठेवून, आपण त्यांस हळू हळू उच्च मार्गावर चढवीत नेलें पाहिजे. ह्या कामाबद्दल मोबदल्याची इच्छा आईबापांनीं ठेवूं नये. मुलें पुढें आपल्या उपयोगीं पडतील, ह्या भावनेनें या गोष्टी करावयाच्या नाहींत, आपलें कर्तव्य ह्मणून करावयाच्या आहेत, हें पूर्ण लक्षांत ठेवावें. आपल्यास संतति प्राप्त झाली, हा आपल्यावर परमेश्वराचा प्रसाद आहे, त्यापासून हें कर्तव्य उत्पन्न झालें आहे. आपण आपलें कर्तव्य योग्यरीतीनें बजावलें, ह्मणजे तें वांयां जाणार नाहीं. त्याचा मोबदला आपल्यास मिळाल्याशिवाय

राहाणार नाहीं, पण आपली दृष्टि मोबदल्यावर गेल्यास शुद्ध प्रेमाचा आपल्यास विसर पडेल. मोबदल्याच्या मानाकडे आपलें लक्ष जाईल, व आपलें योग्य कर्तव्य योग्य रीतीनें आपल्या हातून पार पडणार नाहीं. याकरितां आपलें लक्ष स्वकर्तव्यावर ठेवावें, शुद्ध प्रेमावर ठेवावें, ह्मणजे त्यापासून आपल्या मनास फार समाधान वाटेल, व आपण आपलें कर्तव्य योग्यरीतीनें बजावूं.

३९ कित्येक आईबापांस असें वाटतें कीं संततीवर आपले फार उपकार आहेत, ह्मणून संततीनें आपल्या अर्ध्या वचनांत वागावें. मुलांवर आईबापांचे उपकार नाहींत असें ह्मणून चालावयाचें नाहीं. पण उपकार असले ह्मणून काय झालें? त्याबद्दल मोबदला घेण्याची इच्छा आपण केली, ह्मणजे उपकार केल्याचा मोठेपणा तेवढा कमी झाला. आईबापांच्या उपकरांची फेड होणें शक्य नाहीं, ह्मणूनच त्यांच्या मोबदल्याची इच्छा आपण करावयाची नाहीं. संततीस आईबापांनीं केलेले उपकार पटले व त्यांनीं ते शक्य तेवढे फेडण्याचे प्रयत्न केले, तर उत्तमच. न केले तरी आईबापांनीं रागावूं नये. आपण जे उपकार केले ते फेडीकरितां नव्हत, कर्तव्य ह्मणून केले. तसेच मुलांनीं आईबाप झाल्यावर आपल्या संततीवर करावे, ह्मणजे झालें.

४० संतती झाल्यापासून ती हातातोंडास येईपर्यंत, आईबापांनीं जे कष्ट केले ते मोठे आहेत, पण ते करतांना त्यांस जो आनंद झाला तो काय थोडा आहे!

४१ कृष्णाच्या बाललीला आपण मोठ्या प्रेमानें ऐकतों, याचें कारण काय! नवराबायकोचें परस्परांवरील प्रेम संतति प्राप्त झाल्यानें दुणावतें, संततीच्या अभावीं तें कमी होतें, हें कोणास ठाऊक नाहीं!

**उरोरुहादुद्गमितैः[१] पयोभिरापूर्य केल्या निजमास्यगर्भं।**
**फूत्कृत्य मातुर्वदने हसन्तं तनूभवं पश्यति कोऽपि धन्यः॥**

---

१ मातेच्या स्तनांतून निघणारें दूध आपल्या तोंडांत घेऊन, आईच्या तोंडावर फू करून उडवणारें मूल जो बाप पाहातो तो धन्य होय!

या श्लोकांत वर्णिलेल्या सुखाचा अनुभव आपण जेव्हां घेतों, तेव्हां तें सुख आपल्यास संततीच्या लाभाखेरीज घेतां येतें काय? किंवा त्या सुखाला परिमिति असते काय? **'सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें'** या तुकारामाच्या उक्तीप्रमाणें आपण सुख पार विसरून जातों, व एवढ्या तेवढ्यावरून संततीवर रुसूं लागतों, असें करणें चांगलें नाहीं. आपण संततीवर उपकार केले आहेत ही गोष्ट खोटी नाहीं, पण ते आपण आपल्या तोंडानें संततीस सांगत बसणें चांगलें नाहीं, कारण केव्हां केव्हां तेंच संततीस अधिक कंटाळवाणें वाटतें. आपल्यास वेळोवेळीं संततीपासून जो सुखाचा लाभ मिळाला आहे, तो मनांत ठेवून, आपण आपल्या चित्तास वारंवार शान्त करीत असावें. संततीचे अपराध होतील तेवढे सहन करावे. त्यांस प्रेमळ शब्दानें उपदेश करून त्यांची योग्य मार्गाकडे प्रवृत्ति होईल, असें करण्याचा यत्न करावा.

४२ **सीते**च्या बाळपणांत **जनका**नें तिच्याकडे पाहून जें सुख अनुभविलें, त्याचें वर्णन **कै. परशुरामतात्यां**नीं खालीं लिहिल्याप्रमाणें भाषांतररूपानें **वनदेवते**च्या मुखानें वदविलें आहे:—

**'थोडथोड्या कोवळ्या दंतपंक्ती**
**जयामाजी उगवल्या शुभ्रकांती।**
**जयापासुनि बोबडे बोल गोड**
**निघुनि माझें पुरविलें तिहीं कोड'** ॥ १ ॥

४३ हा अनुभव प्रत्येक आईबापाला येण्यासारखा आहे. तो पदोपदीं येणारा आहे. त्या आनंदाला पारावार नाहीं. मुलांच्या जोपासनेंत जे कष्ट होत असतात, ते आईबाप याच आनंदाच्या जोरावर सोसतात, व आपल्या संसाराचा गाडा आनंदानें ओढीत असतात. मग हा असला आनंद ज्या संततीपासून आपल्यास मिळाला आहे, तिच्यावर रुसणें आपणांस वाजवी नाहीं. तिच्यापासून मिळेल तेवढा सुखाचा मोबदला आईबापांनीं खुशाल घ्यावा, पण न मिळाल्यास रिकामी हांव धरून आपल्या संततीवर रागावूं नये.

४४ मुलें वाढत चाललीं ह्मणजे आपल्या वयाप्रमाणें आपल्यास मान मिळावा, असें त्यांस वाटत असतें. अशा वेळीं–जरी तीं आपलीं मुलें असलीं तरी–त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांस वागवावें. लहानपणीं आपण मुलांस जसें वागविलें तसेंच वागवूं नये. लहानपणीं **'राम्या'** ह्मटलें ह्मणून नेहमीं तसेंच ह्मणावें, असें नाहीं. **रामू, रामभाऊ,** किंवा असाच दुसरा कांहीं बदल त्यांत करण्यास हरकत नाहीं, इतकेंच नव्हे, पण बदल करणें इष्टही आहे. लहानपणीं सुद्धां **'राम्या'** ह्मणणें चांगलें नाहीं, पण तसा पाठ असल्यास तो पुढें बदलून चांगल्या शब्दानें त्यांस संबोधणें इष्ट आहे. आईबापांचा अपमान करावा, त्यांस त्रास द्यावा, असा संततीचा विचार नसतांही केव्हां केव्हां गैरसमजानें त्यांच्या हातून तशा गोष्टी घडतात. त्यावेळीं सोईच्या वाटेनें मुलांची चूक त्यांच्या लक्षांत आणून द्यावी, ह्मणजे त्यांची चूक त्यांस समजून त्यांच्या वर्तनांत सुधारणा होईल. आईबापें वयानें मोठीं असल्यामुळें त्यांचा अनुभवही मोठा असतो, संतति अल्पवयी असल्यामुळें त्यांस फारसा अनुभव नसतो, याकरितां संततीच्या चुका होणें स्वाभाविक असतें. त्यांच्या चुकांबद्दल न रागावतां त्यांची कींव करावी, व होतां होईतोंपर्यंत त्यांच्या चुका उपदेशानें सुधारण्याचा प्रयत्न करावा. सुधारणा करतांना केव्हां केव्हां आपल्यास पुष्कळ कष्ट पडतील, पण आपल्या कर्तव्यावर लक्ष ठेवून आपण ते सोसावे व संततीस शहाणें करून सोडावें.

४५—**'लालयेत् पंच वर्षाणि दश वर्षाणि ताडयेत् ।**
**प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत् ॥'**

हा श्लोक एका पूर्व कवीचा आहे, तो विचारणीय आहे. पांच वर्षें ह्मणजे अगदीं अज्ञान दर्शेतील. या पांच वर्षांत मुलांस कांहीं कळत नसतें. याकरितां त्यांचे लाड करावे, असें कवि ह्मणतो, पण ते लाडही बेताचे करावे, हें मागें सांगितलेंच आहे. दहा वर्षें मुलांस शिक्षा करावी, ह्मणजे शिक्षण द्यावें, व तें देतांना शासन करावें लागलें तरी चिंता नाहीं, असें कवि सांगतो, कारण

हीं दहा वर्षें अत्यंत महत्वाचीं आहेत. या दहा वर्षांत मुलांस रीतीभाती लावावयाच्या, सुशिक्षण द्यावयाचें, त्यांच्यांत सद्गुण उत्पन्न करावयाचे, व सर्वप्रकारच्या सुधारणा त्यांस दाखवून द्यावयाच्या. याकरितां या वयांत शिक्षा केली तरी हरकत नाहीं, असें कवीचें सांगणें आहे. पण याही वयांत शिक्षा फारशी—अगदीं जरूर पडल्याशिवाय—करूं नये, असें वर सांगितलेंच आहे. मुलांचें वय सोळा वर्षांचें झाल्यावर त्यांस मित्राप्रमाणें वागवावें. म्हणजे त्या वागण्यांत श्रेष्ठ कनिष्ठ भाव बेताचा असावा, पण प्रेम जास्त असावें. मर्यादा ही केव्हांही पाहिजेच. पण ती दुजाभाव उत्पन्न होण्यासारखी नसावी. कित्येक करारी आईबापांपुढें उभें राहाणें-ही मुलांस कठीण वाटतें, मग बोलण्याचें लांबच राहिलें! इतका परकेपणा काय कामाचा? सोळा वर्षांचीं मुलें झालीं, म्हणजे त्यांस आपलेपणा कळूं लागतो. आपण मोठे झालों, असें त्यांस वाटूं लागतें. खरा मोठेपणा कशांत आहे, हें त्यांस चांगलेंसें कळत नाहीं; यावेळीं त्यांस तुच्छपणानें वागविल्यास त्यांस बरें वाटत नाहीं. थोडें मानमान्यतेनें वागविल्यास त्यांस बरें वाटतें. त्यांच्यावर कोणत्याही एखाद्या गोष्टीचा परिणाम ताबडतोब होण्याचा संभव असतो. यामुळें तीं बिघडण्याचा पुष्कळ वेळ संभव असतो. याकरितां त्यांच्याशीं ममतेची वागणूक ठेवल्यास व त्यांस चांगलें वाईट समजून सांगितल्यास, त्या सांगण्याचा परिणाम त्यांच्या मनावर पुष्कळ वेळां चांगला होतो. म्हणून त्यांस मित्रत्वानें वागवावें, असें कवि म्हणतो, पण मित्रत्वानें वागविणें नेहमीं फायद्याचेंच आहे हें वर दाखविलेंच आहे. त्यांच्यावर रिकामा दाब बसविण्याच्या भरीस पडूं नये. तरुणपणामुळें त्यांची वृत्ति स्वाभाविक उद्दाम बनलेली असते.

४६ यावेळीं तो त्यांच्या वयाचा दोष असतो. तो हळू हळू संभाळून घेतल्यास नाहींसा करतां येतो. वेगळ्या वेगळ्या वयाच्या आमदानींत वेगळीं वेगळीं देहाचीं स्वरूपें बनतात, त्याप्रमाणें मनाच्या वृत्तिही बदलतात. त्या स्वाधीन ठेवावयाच्या असल्यास

किंवा त्यांस योग्य वळण लावावयाचें असल्यास, वडील मनुष्यांनीं विशेष काळजी घेतली पाहिजे. त्यांस मित्रत्वानें वागवावें, त्यांच्यावर फाजील दाब ठेवूं नये, त्यांचा कल स्वातंत्र्याकडे स्वाभाविक असतो, तो तसाच कायम ठेवून स्वातंत्र्याची खरी कल्पना त्यांच्या मनांत बिंबवून देण्याचा प्रयत्न करावा; व त्यांच्या उच्छृंखल वृत्तीस हळूहळू जपून आळा घालावा. बाळपण व वृद्धपण यांच्यामधली पायरी–तरुणपण–ही आहे. एखाद्या समुद्रांत आरंभीं व अखेरीस चांगला रस्ता असून मध्यें मात्र भयंकर खडक असावे, तशी तरुणपणाची गोष्ट आहे. नाविकानें त्या खडकावर गलबत आपटूं नये म्हणून काळजी घेतली, तर मात्र गलबत सुरक्षित तडीला लागेल; त्याप्रमाणेंच आईबापांनीं या वयांत मुलांस संभाळून वागविल्यास, त्यांची पुढील जीवितयात्रा सुखाची होईल. त्यांच्या मनाप्रमाणें वागूं दिल्यास संतति बेताल होईल व आंपल्याच मताचा आग्रह धरल्यासही संतति बेताल होईल, याकरितां त्यांचें मन न दुखवितां, हळूहळू आपलें वळण त्यांस लावण्याकरितां जपून सौम्यपणानें प्रयत्न करावे, म्हणजे उभयतांचें हित होईल. आपण मुलांवर जुलूम करितों, अशी त्यांची भावना झाल्यास, तीं जुलुमाचा प्रतिकार करूं लागतील, व त्यामुळें आईबापांच्या चांगल्या आज्ञाही तीं केव्हां केव्हां ऐकणार नाहींत. आपल्यास जें वर्तन चांगलें वाटेल, त्याची त्यांच्याजवळ प्रशंसा करावी, त्याचा चांगुलपणा त्यांस उघड करून दाखवावा; त्या वर्तनानें ज्यांचा फायदा झाला असेल, त्यांचीं उदाहरणें त्यांस सांगावीं; व गोडीगुलाबीनें त्यांचीं मनें सत्कार्याकडे वळवावीं.

४७ मुलें करतीं झालीं व तीं आपल्याजवळ राहात असलीं, तर प्रपंचाचा थोडथोडा भार त्यांच्यावर टाकीत जावा, म्हणजे तींही प्रपंचांत वाकब होतील; त्यांस रिकामा वेळ सांपडणार नाहीं, व त्यांस वेडेवांकडे नादही लागणार नाहींत. कित्येक आईबाप त्यांस काम तर सांगतच नाहींत, पण 'त्यांच्यानें तें व्हावयाचें नाहीं, मलाच केलें पाहिजे' असें म्हणून त्यांची रिकामी निंदा मात्र

करितात; त्यामुळें मुलें निरुत्साही होतात व केव्हां केव्हां आई-बापांबद्दल त्यांचा वाईट ग्रह मात्र होतो. एखादा मोठा व्यापारी, आपल्या हाताखालीं अनेक गुमास्ते ठेवून त्यांच्या साह्यानें अनेक धंदे चालवितो, व त्यांच्या कुटुंबांचें हित साधून आपलें हित साधतो; त्याप्रमाणेंच बापानें आपल्या धंद्याचें काम थोडथोडें मुलांवर सोंपवून, त्या सर्वांस धंद्यांत तरबेज करावें. त्यांच्या हातून चूक झाल्यास ती त्यांस दाखवावी, व दुसऱ्या वेळीं दुरुस्त करण्यास सांगावें. नुकसान झाल्यासही रागावूं नये; नुकसान कां झालें, तें कसें टाळतां आलें असतें, या गोष्टी त्यांस समजून सांगाव्या. **'व्यापार करतां सोळा बारा,' 'चांगली नजर ठेवणाराही एखादे प्रसंगीं फसतो'** असें सांगून त्यांच्या कोमेजलेल्या मनास प्रफुल्ल करून उत्तेजन द्यावें, व त्यांस अपेक्षित कार्यांत तरबेज करावें.

४८ मुलांचें व आपलें जमल्यास एकत्र राहावें, न जमल्यास वेगळें राहावें; भांडत बसूं नये, वैर वाढवूं नये व तोटा आपण सोसावा. पशुपक्षी आपल्या संततीस वाढवितात, त्यांचें पालन-पोषण करतात, तरी त्यांची संतति त्यांच्याजवळ कोठें राहाते? ती आपला निर्वाह करूं लागल्यावर आईबापांजवळ येतांना फारशी आढळत नाहीं. हा विचार मनांत आणून, आपण आपल्या संततीवर केव्हांही रुसूं नये. आपल्या मुलांस मुलें होऊं लागलीं, म्हणजे आपल्या मुलांची प्रीति त्यांच्या संततीवर अधिक दिसूं लागली, व त्यांनीं आईबापांस अंमळ कमी विचारलें, म्हणूनही रागावण्याचें कारण नाहीं. कारण ही स्वाभाविक स्थिति आहे. आपली प्रीति आपल्या संततीवर असते, तशी आपल्या संततीची प्रीति त्यांच्या संततीवर असणार, हें सहज आहे. संततीनें आई-बापांस विचारूं नये, असा याचा अर्थ समजावयाचा नाहीं, तें ( विचारणें ) संततीचें कर्तव्यच आहे; पण आपण विरुद्ध प्रकार दिसला तरी रागावूं नये, एवढाच या सांगण्याचा अर्थ समजावयाचा. आईबापांनीं आपल्या संततीचें कल्याणच नेहमीं चिंतावें. त्यांच्या

संततीस चांगलें वळण आरंभापासून लागलेलें असल्यास, तीही आपलें कर्तव्य विसरणार नाहीं, व वृद्ध आईबापांस योग्य तें सहाय केल्याशिवाय राहाणार नाहीं.

४९ केव्हां केव्हां संतति झाल्यावर कोणी मनुष्य मेल्यास, किंवा आईबापांपैकीं कोणी गत झाल्यास, त्याच्या मरणाचें अपेश संततीवर ठेवून, राहिलेलीं माणसें त्या संततीचा अव्हेर करतांना दृष्टीस पडतात. हा प्रकार तर फारच वाईट. ह्या संसारांत आधीं कोणी जावें व मागें कोणी राहावें, हें ठरलेलें नाहीं. बरें ठरलेलें असेल, तर तें चुकवितां येणार नाहीं. ज्याची वेळ येईल, तो जाईल. मागें राहाणारानें सर्व शोक बाजूला ठेवून आपलें कर्तव्य बजावलें पाहिजे. **अहल्याबाई**ची मुलगी आपल्या नवऱ्या-मागून सती गेली. **अहल्याबाई** नवऱ्याच्या मागें राहिली, तरी तिणें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावून, आपलें नांव **हिंदुस्ता-नां**तील राज्यकर्त्यांत संस्मरणीय करून ठेविलें. मागें राहाणारानें भलत्याच गोष्टीवर भरंवसा ठेवून आपलें मन कलुषित करून घेऊं नये. नाउमेद करणारे विचार मनास शिवूं देऊं नयेत. योग्य धैर्यानें आपलें कर्तव्य करीत असावें. **विश्वकर्त्या**स सर्व जगाची काळजी सारखीच आहे. त्यास हें जग चालवावयाचें आहे, त्याचा नाश करावयाचा नाहीं. त्याच्या मनांत आल्यास तो हें एका क्षणांत नाहींसें करील. त्याचें कर्तृत्व किंवा त्याच्या कर्तृत्वाचे हेतु, आपल्यास नीट किंवा लौकर कळत नाहींत. पण आपलें कर्तव्य आपण योग्य रीतीनें बजावणें हें आपलें मुख्य काम आहे, तें आपण निरलसपणें करीत राहावें. संतति प्राप्त झाल्यास तिच्या जोपासनेंत कमतरता करूं नये. मुलगा झाला व बाप मेला, म्हणजे एखादी आई त्या तान्हुल्यावर संतप्त होऊं लागते, पण हें चांगलें नाहीं. त्या तान्हुल्याला बाप नाहींसा झाला, तसा स्त्रीला पति नाहींसा झाला, यांत त्या एकट्या तान्हु-ल्याचें मात्र पातक काय? असें कधीं म्हणतां येणार नाहीं. पतीचा भावी वियोग स्त्रीला सुखकर व्हावा, म्हणून त्या दयाळू

परमेश्वरानें तिला अपत्याची जोड कशावरून दिली नसेल? ज्या स्त्रिया अपत्यहीन असून पतिविरह अनुभवीत असतात, त्यांच्यापेक्षां आपली स्थिति अधिक सुखकर आहे, असें तिनें मनांत आणावें; व आपल्या संततीची योग्य जोपासना करण्यांत आपलें आयुष्य खर्चावें.

५० घरांत नवी गाय आणली, म्हणून असें झालें, (एखादें मनुष्य दगावलें); सून केली, तिचा हा पायगुण, असल्या शंका बिलकूल घेऊं नयेत; व आपल्या मनास उगीच दुःख करून घेऊं नये. आपल्यावर जे प्रसंग येतील, ते आपले आपण सोसले पाहिजेत. आपल्या कर्तव्यावर नजर ठेवून आपण वागावें म्हणजे झालें.

५१ आपल्यास अनेक मुलें असल्यास त्यांच्यावर आपलें प्रेम एकसारखें असावें. तसें नसलें तरी, होतां होईतों आपण त्यांच्याजवळ समभावानें वागण्याचा प्रयत्न करावा. नाहींतर आपल्याच वागणुकींत भेद दिसल्यास, सर्वांस तो उदाहरणासारखा होऊन, त्याचा परिणाम कुटुंबाच्या नाशास कारण होईल. शेवटीं सांगावयाचें इतकेंच कीं, आईबापांनीं आपल्या संततीवर निरपेक्ष प्रेम करावें. आपण व्यवस्थित रीतीनें वागावें. संततीस चांगल्या रीति लावण्याकरितां आपली शिकस्त करावी, म्हणजे ईश्वराच्या कृपेनें त्यांची संतति त्यांस सुख देणारी निपजल्याशिवाय राहाणार नाहीं. निरपेक्ष प्रेम ईश्वरास सुद्धां आवडतें. यामुळें त्यांचें संततीविषयीं निरपेक्ष प्रेम त्यांस ईश्वराचा मार्ग मोकळा करून देईल. आईबापांनीं मुलांशीं कसें वागावें, याबद्दल सुचलेल्या गोष्टी येथवर सांगितल्या. त्यांचें आईबापांनीं मनन करून त्याप्रमाणें वागणूक ठेवल्यास, त्यांचा व संततीचा फायदा होईल.

---

## भाग तिसरा—मुलांचें शिक्षण.

१ प्राचीनकाळीं विद्यादानाची पद्धति आतांच्या सारखी नव्हती. विद्यार्थी गुरुगृहीं राहून विद्या करीत असत, यामुळें ते सर्वकाळ गुरूच्या देखरेखीखालीं असत. गुरूनेंच त्यांचें पालनपोषण रक्ष-

चयाचें, व त्यांस विद्यादानही करावयाचें. गुरूंचे आश्रम बहुधा रानावनांत–निदान घडामोडीच्या शहरांपासून दूर–असत. यामुळें तीं ठिकाणें विद्याभ्यासास योग्य अशीं असत. विद्यार्थ्यांस गुरूंच्या तंत्रानें वागावें लागत असल्यामुळें, गुरूंस विद्यार्थ्यांवर वेगळा दाब ठेवावा लागत नसे. विद्याभ्यास संपेपर्यंत गुरूंच्या आश्रमींच वास असल्यामुळें, विद्याभ्यासास व्यत्यय येण्याची भीति अगदीं नसे. गुरूची शुश्रूषा व विद्याभ्यास हीं नेमकींच कामें विद्यार्थ्यांस असल्यामुळें, त्यांचा अभ्यास नियमितपणें चालत असे. अशी परिस्थिति असल्यामुळें बापानें मुलाची मुंज लावली,–किंवा गुरूनें लावली,–म्हणजे एकदा मुलास गुरूच्या स्वाधीन केल्यावर, त्या मुलाची काळजी बापास करावी लागत नसे; तो बोजा गुरूवर असे. विद्याभ्यास पुरा झाल्यावर गुरूनें शिष्यास समावर्तनाची परवानगी द्यावयाची, व मग शिष्यानें विवाह करावयाचा, अशी व्यवस्था असे; यामुळें मुलांच्या शिक्षणाची काळजी बापास करण्याची जरूरी नसे.

२ परंतु ही स्थिति पालटल्यास फार वर्षें झालीं. यानंतर राज्यक्रांतीच्या अनेक घडामोडींमुळें, अशा विद्या शिकण्याच्या सोई नाहींशा झाल्या. मुलांच्या शिक्षणाची सोय चांगलीशी लागेनाशी झाली. यामुळें बापास जी विद्या येई, तीच परंपरेनें मुलांस व नातवांस येई. अशा स्थितीमुळें ज्योतिषी (जोशी), शास्त्री, पुराणिक, वैद्य, अशीं पिढीजाद चालणारीं घराणीं उत्पन्न झालीं.

३ पुढें तोही काळ पालटला. शिक्षणाची बहुतेक अव्यवस्थाच झाली. ज्यांच्या घराण्यांत पिढीजाद विद्या राहिली, त्यांच्याखेरीज बाकीच्या लोकांस, विद्या बहुधा प्राप्त होईनाशी झाली. गांवांत साधारण लिहिणारा वाचणारा जो असेल, त्यानें शाळा घालावी, व सामान्य लोकांनीं आपलीं मुलें तींत घालावीं, असा प्रकार सुरू झाला. या शाळांस 'तात्या पंतोजींच्या शाळा' असें म्हणत. याखेरीज गांवांत एखादा वैदिक, किंवा शास्त्रीपुराणिक असल्यास, तो आपल्या घरीं येणाऱ्या विद्यार्थ्यांस, फावल्या वेळीं त्याला येणारी

विद्या शिकवी. यापलीकडे विद्येचा बहुतेक लोपच झाला. बहुतेकांची उडी साधारण लिहिणें वाचणें शिकणें, किंवा हिशेबठिशेब शिकणें, बेतापुरती भिक्षुकी शिकणें; किंवा पुराण सांगण्यास शिकणें, किंवा बाहाडी वैद्य तयार होणें, यापलीकडे जाईनाशी झाली.

४ मध्यंतरीं **पेशवाई**त ब्राह्मणांस दक्षिणा मिळूं लागल्यामुळें, वेदाध्ययन व शास्त्राध्ययन करण्याकडे त्यांचें लक्ष विशेष लागलें होतें, पण तें जातिविशेषापुरतेंच होतें.

५ इंग्रज सरकारचें राज्य झाल्यापासून ही स्थिति पालटली, त्यांनीं सार्वजनिक शिक्षणाची योजना केली. बहुतेकांचें शिक्षण हल्लीं याच मार्गानें चाललें आहे. आरंभीं आरंभीं थोडें बहुत इंग्रजी शिकल्यानें, मोठमोठ्या पगाराच्या जागा लोकांस मिळाल्यामुळें, इंग्रजी शिकण्यावर लोकांच्या फार उड्या पडूं लागल्या, व आतां तर त्या भाषेचें अध्ययन अगदीं अगत्याचें होऊन गेलें आहे. पंतोजींच्या ताब्यांत मुलें नियमित तास असत, तशीं आतांच्या मास्तरांच्या ताब्यांतही तीं नियमित तासच असतात. यामुळें मुलांवर आईबापांची नजर असणें त्यावेळीं अगत्याचें होतें, तसें हल्लींही अगत्याचें झालें आहे. मुलांवर शिक्षकांची नजर सर्वकाळ असावी, हें चांगलें. पण ती हल्लींच्या स्थितींत असणें शक्य नाहीं. तेव्हां तीं घरीं आल्यावर त्यांच्यावर आईबापांची नजर असावी, हें योग्य आहे. यामुळें आपल्या मुलांवर नजर ठेवणें, हें आईबापांस एक नवें कर्तव्य उत्पन्न झालें आहे; म्हणून मुलांच्या शिक्षणाकरितां आईबापांनीं काय करावें, हा प्रश्न उत्पन्न झाला. त्याबद्दल येथें चार शब्द लिहिण्याचें योजिलें आहे.

६ आपल्या देशांत अशिक्षित लोक पुष्कळ आहेत. शिक्षणाची थोडीबहुत आस्था बाळगणारे बरेच आहेत, पण शिक्षणाविषयीं विशेष आस्था बाळगणारे अगदीं कमी आहेत. तरी पण, आईबापांनीं शिक्षणाच्या कामांत मुलांस मदत करणें जर अगत्याचें आहे, तर त्याबद्दल चार शब्द लिहून ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. दिवसेंदिवस शिक्षणाकडे पुष्कळ लोकांचें लक्ष लागत चाललें

आहे, व परिस्थिति अशी येत चालली आहे कीं, उत्तरोत्तर शिक्षणाशिवाय बहुधा कोणाचें चालावयाचेंच नाहीं! याकरितां आईबापांनीं मुलांच्या शिक्षणाकरितां काय करावें, या प्रश्नाचा थोडासा विचार करूं.

७ शिक्षणासंबंधीं आईबापांचें कर्तव्य काय असावयाचें! गांवांत जी शिक्षणाची सोय असेल, किंवा जी शाळा असेल, तींत एकदां मुलाचें नांव अडकवून दिलें, त्याला लागणारें सामान घेऊन दिलें, व पुस्तकें पुरविलीं, म्हणजे आपलें काम झालें; अशी बहुधा पुष्कळ आईबापांची समजूत असते. मग मास्तर जाणे आणि मुलगा जाणे! फार झालें तर वार्षिक परीक्षा झाल्यावर मुलगा वरच्या इयत्तेंत चढला तर बरेंच झालें, न चढला तर शिक्षकास भेटून साधेल तेवढी खटपट करून त्यास वरच्या इयत्तेंत घालावयाचें; जरूर पडल्यास कमी असलेले अभ्यास पुरे करण्याकरितां एखादा खासगी शिक्षक ठेवून द्यावयाचा, किंवा ठेवण्याचें आश्वासन द्यावयाचें; म्हणजे आपलें काम झालें, असें बहुतेक आईबापांस वाटतें. त्यांच्या शिक्षणाबद्दल आणखी कांहीं जबाबदारी आपल्यावर आहे, असें पुष्कळ आईबापांस वाटत नाहीं. कित्येक आईबापांस असें वाटतें, कीं घरीं रिकाम्या वेळीं मुलें उगीच इकडे तिकडे हिंडतात, त्यांस आवरण्याकरितां घरीं एखादा पगारी मास्तर ठेवून दिला, म्हणजे झालें आपलें काम! कितीएक आईबापांस आपल्या मुलांस कांहीं शिक्षण दिलें पाहिजे, अशी कल्पनाच नसते! ज्याप्रमाणें त्यांचें जन्म झालें आहे, त्याप्रमाणेंच त्यांचें शिक्षणही होईल. त्याबद्दल कांहीं वेगळी खटपट करावयास पाहिजे,

१ "मुलांच्या खाण्यापिण्यासंबंधानें व लत्त्याकपड्यासंबंधानें काळजी घेतली, व सरकारी किंवा खासगी शाळांत त्यांस फी देऊन पाठविलें, किंवा तशी सवड नसेल, तर त्यांस शिकविण्याकरितां घरीं पगार देऊन शिक्षक ठेविले, म्हणजे आपली मुलांच्या संबंधानें कर्तव्यमर्यादा संपली, असा लोकांचा साधारण समज आहे."

आत्मनीतीचीं तत्वें—पृष्ठ. १७८

असें त्यांच्या मनांत कधींही येत नाहीं. हा शेवटला वर्ग जरी सोडून दिला, तरी बाकीच्या वर्गातील लोकांचीही समजूत, याबाबतींत चांगलीशी झालेली नसते. शिक्षण देण्याचें काम आईबापांचें आहे, तें त्यांनींच बजाविलें पाहिजे; मुलांच्या मनास वळण लावण्याचें काम आईबापांचें आहे, तें त्यांनींच केलें पाहिजे; अशी त्यांची दृढ समजूत झालेली नसते. हें केल्याशिवाय आईबापांचें कर्तव्य पुरें होत नाहीं, असें त्यांस वाटत नाहीं. पण हें बरोबर नाहीं. प्रजोत्पादनापासून होणाऱ्या सुखाबरोबरच ही जबाबदारी त्यांच्यावर पडते. पुढील उतारा पाहाः—"प्रजोत्पादनापासून सुख होईल तेवढें मात्र भोगावयाचें, व त्या मुलांचें पालन, पोषण, किंवा शिक्षण ह्यांची जबाबदारी लोकांवर टाकावयाची, असें मात्र कामाचें नाहीं. सुखोपभोग व त्याबरोबर आंगावर पडणारी जबाबदारी, ह्या दोन्ही गोष्टींची नेहमीं सांगड असली पाहिजे."

**आत्मनीतीचीं तत्वें—पृष्ठ १८१.**

ह्यावरून मुलांस शिक्षण देणें हें आईबापांचें कर्तव्य आहे, हें सहज लक्षांत येईल.

८ **'अविद्यं जीवनं शून्यं'** असें म्हटलें आहे. तेव्हां विद्या न शिकवितां, आपल्या मुलांचें जीवित असून नसल्यासारखें करण्याचें, कोणत्या आईबापांस बरें वाटेल? जें काम आपण करूं, तें चांगलें होईल; तसें दुसऱ्यावर टाकून होणार नाहीं, हें त्यांच्या लक्षांत असेलच. याकरितां हजारों अडचणी दूर करून, मुलांचें शिक्षण आपल्या हातांत घेणें, आईबापांचें कर्तव्य आहे. पण निर्वाहाचा धंदा करून, हें काम स्वतां करणें सर्व आईबापांस शक्य नाहीं. परंतु मुलांच्या चालू असलेल्या शिक्षणावर तरी, योग्य ती देखरेख ठेवण्याकरितां, अवश्य ती खटपट त्यांनीं केली पाहिजे. केवळ मुलें शाळेंत जात आहेत, व तीं शिकत आहेत, एवढ्यावर स्वस्थ राहाणें चांगलें नाहीं. अशा करण्यानें त्यांचा त्यांनाच पस्तावा झाल्याशिवाय राहाणार नाहीं. पुढील उतारा पाहाः—

"परंतु परोपकाराच्या दृष्टीनें आईबापांच्या कर्तव्याचा विचार केला असतां, त्याची मर्यादा अधिक वाढविली पाहिजे. मानसिक शिक्षणाचे कांहीं भाग, शिक्षकांवर सोपविले असतां चालतील, परंतु कित्येक भागांकडे आईबापांनीं स्वतां लक्ष पुरविलें पाहिजे. बुद्धिविषयक शिक्षणाचा पुढील भाग, शिक्षकांवर सोपविण्यापासून फायदा आहे, परंतु त्या संबंधाचा आरंभींचा भाग व नीतिशिक्षणाला अंगभूत असें जें मनोविकारांचें ( मनोवृत्तींचें ) शिक्षण तें, हीं आईबापांनीं आपल्या हातांत घेतलीं पाहिजेत."

**आत्मनीतीचीं तत्वें**–परोपकार–पृष्ठ १७८.

९ शिक्षणाकरितां मुलें शिक्षकाच्या हवालीं केलीं, तरी देखील तीं नियमित वेळ मात्र शिक्षकाच्या ताब्यांत राहावयाचीं, बाकीचा त्यांचा वेळ आईबापांच्या समागमांत जावयाचा; त्या वेळेस त्या मुलांवर आईबापांची देखरेख असली पाहिजे. आईबापें सुशिक्षित असतील, तर त्यांनीं आपलीं कामें करून शिल्लक राहिलेला वेळ, आपल्या मुलांच्या शिक्षणांत घालवावा. मुलांस चांगलें वळण लावण्याचें काम, आईबापांशिवाय कोणास करतां यावयाचें नाहीं. त्यांचें वर्तन चांगलें असलें, म्हणजे तीं सहज सद्वर्तनी निघतील, तरी आईबापांची मुलांवर नजर हवीच. आईबापांस, प्रश्नोत्तरांच्याद्वारें पुष्कळ ज्ञान मुलांस करून देतां येईल, त्यांच्या चुका नाहींशा करतां येतील, त्यांस मदत करतां येईल. आईबापांशीं त्यांचा प्रेमसंबंध असल्यामुळें, आपलें मनोगत तीं आईबापांजवळ जसें मोकळ्या मनानें सांगतील, तसें इतरांजवळ सांगणार नाहींत. यामुळें मुलांच्या मनांत कोणत्या गोष्टी घोळत आहेत, त्यांत चांगल्या किती आहेत, वाईट किती आहेत, चांगल्यांस मात्र स्थान मिळावें, वाईटांचें निर्मूलन व्हावें, याकरितां काय करावें, हें ठरवून त्याप्रमाणें त्यांस वागतां येईल; मुलांच्या शाळेंतल्या शिक्षणास त्यांस मदत करतां येईल; याकरितां आईबापांनीं, फावल्या वेळांत मुलांस अवश्य मदत करावी, व आपलें लक्ष त्यांच्यावर ठेवावें.

१० मुलें शाळेंत जातात व शिकतात, इतक्याच गोष्टीनें त्यांनीं समाधान मानून घेऊं नये. तीं शाळेंत काय शिकतात, कसें शिकतात, जें शिक्षण त्यांस मिळत आहे, तें किती योग्यतेचें आहे, त्यांत कांहीं फरक करावयास पाहिजे किंवा कसें, याचा तपास त्यांनीं ठेवावा. मुलें आपला शाळेबाहेरचा वेळ कसा घालवितात, त्यांचें वर्तन कसें आहे, त्यांचा स्नेहसंबंध कोणत्या मुलांशीं आहे, तीं मुलें कशीं आहेत, त्यांची वागणूक शाळेंत व बाहेर कशी आहे, इत्यादि गोष्टींचाही तपास त्यांनीं ठेवावा. मुलांचा शिक्षकांशीं फार थोडा संबंध असल्यामुळें, त्यांचे दुर्गुण किंवा वाईट स्वभाव, शिक्षकांस समजून येण्याचा संभव कमी असतो. पण आईबापांनीं लक्ष ठेवल्यास, प्रयास न पडतां त्यांस ते समजतील, व वेळेवर त्यांचें निर्मूलनही त्यांस करतां येईल. कोणताही दुर्गुण वाढला नाहीं, फारसा चिकटला नाहीं, तोंच त्याची झाडणी करणें इष्ट असतें. मुलांचा दुर्गुण दृष्टोत्पत्तीस आल्यास तो झांकून ठेवूं नये. बोभाटा न करितां, तो नाहींसा करण्याकरितां सामोपचाराचे उपाय प्रथम योजावे. जरूर वाटल्यास शिक्षकांचीही मदत त्या कामांत घ्यावी. परंतु मुलें शाळेंत जात आहेत, त्यांच्याकडे पाहाण्याचें आपणांस कारण नाहीं, असें मनांत आणून स्वस्थ कधींही बसूं नये, त्यापासून आपल्या संततीचें जन्माचें नुकसान होईल व त्यांस जन्मभर पश्चात्ताप करावा लागेल.

११ शाळेंत मुलांचें शिक्षण कसें चालतें, हें पाहाण्याकरितां त्यांनीं वारंवार शाळेंत जावें; शिक्षकांची गांठ घ्यावी; शिक्षणांत उणीवा दिसल्यास, शिक्षकांच्या साह्यानें त्या काढून टाकण्याचा प्रयत्न करावा; शिक्षण चाललें आहे, तें सोईवार नाहीं; त्यापासून आपल्या संततीस उपयोग होत नाहीं; असें वाटल्यास तें असावें कसें, तसें शिक्षण मिळण्यास काय तजविजी केल्या पाहिजेत, याचा त्यांनीं पूर्ण विचार करावा; व तसें शिक्षण शाळांतून चालावें, याकरितां योग्य ती खटपट करावी. शाळा सरकारानें चालविल्या असल्या, तरी त्यांतलें शिक्षण लोकमताप्रमाणें ठेवणें, सरकारासही

अगत्याचें आहे. मात्र त्यांतल्या उणीवी स्पष्ट व योग्यरीतीनें आपण सरकारच्या दृष्टीस आणाव्या. याकरितां खटपट करतांना कंटाळूं नये.

१२ काळ नेहमीं बदलत असतो. त्याप्रमाणें सर्व गोष्टी बदलत असतात. आम्ही तात्यापंतोजीच्या शाळेंत शिकलों, त्या शाळा आतां नाहींशा झाल्या. आतां ज्या शाळा आहेत, त्यांत आम्हांस कांहीं फरक हवासा वाटला, म्हणून त्यांत कांहीं नवल नाहीं. तो कालमहिमा आहे. तो कोणास टाळतां यावयाचा नाहीं. आतां ज्या शाळा आहेत, त्यांचें धोरण काय आहे, त्यांत बरें वाईट काय आहे, त्या परिस्थितीला धरून आहेत किंवा सोडून आहेत, याचा विचार आईबापांनीं करावा. त्यांत बदल करावा असें त्यांस वाटत असेल, तर त्यांनीं तसा बदल सरकारच्या विचारानें करून घ्यावा; किंवा खासगी संस्था काढून त्या चांगल्या चालवून, आपण म्हणतों त्याचा प्रत्यय लोकांस व सरकारास दाखवावा.

१३ फार प्राचीन काळीं मुलांचा व गुरूंचा नित्य संबंध असे, हें मागें सांगितलेंच आहे. असा संबंध असणें फार अगत्याचें आहे. **इंग्लंडां**तील पुष्कळ शहरांत अशा शाळा हल्लीं आहेत. आपल्या इकडेही कांहीं मोठ्या शहरीं व जिल्ह्याच्या ठिकाणीं, अलीकडे खासगी संस्थांनीं व सरकारानें, अशाप्रकारचे प्रयत्न थोडथोडे सुरू केले आहेत. पण अशा संस्था सर्वत्र होणें तूर्त तरी कठीण आहे. याकरितां, प्रथम हल्लीं असलेल्या शाळांतच होईल तेवढी सुधारणा करण्याचा प्रयत्न करणें इष्ट आहे. आपल्याकडील शाळांत जीं मुलें जातात, त्यांतील बहुतेक आईबापांच्या जवळ असतात, त्यांच्यावर देखरेख करण्याचें काम आईबापांनीं मनापासून केल्यास, त्यांच्या मनाप्रमाणें बऱ्याच गोष्टी घडून येतील. सर्वप्रकारचें शिक्षण शाळेंत व्हावें, किंवा मुलें गुरूंच्या सहवासांत अक्षय असावीं, असें आपल्यास वाटत असल्यास, ज्यांवर शिक्षकांची देखरेख अक्षय राहील, अशाप्रकारच्या शाळांचा प्रसार अधिक करण्यास झटावें; नाहींतर असलेल्या शाळाच कायम आहेत,

तोंपर्यंत मधल्या वेळांत मुलांवर देखरेख करण्याचें काम, त्यांनीं पतकरावें.

१४ आपल्यावरील ही जबाबदारी थोडीबहुत कमी करण्याच्या इराद्यानें, श्रीमंत गृहस्थ आपल्या मुलांस शिकवण्याकरितां, घरीं वेगळे शिक्षक ठेवून देतात, पण इतक्यानें सर्व काम भागत नाहीं. कारण ज्यांस सामर्थ्य नाहीं, त्यांची सोय यांत होत नाहीं. याकरितां, खासगी शिक्षक ठेवून आपली मात्र सोय करून घेण्यापेक्षां–केवळ आपलाच स्वार्थ साधण्यापेक्षां–सार्वजनिक शिक्षण सुधारण्याकरितां लागेल ती मेहनत करणें, अधिक महत्वाचें आहे. सार्वजनिक शिक्षण सुधारल्यानें व्यक्तिमात्राला फायदा होईल, व अशा कामांत श्रीमंतांनीं लक्ष घातल्यास, त्यांचा लौकिक होऊन सर्व समाजाचें हित होईल.

१५ शाळेंतील शिक्षण व्यवस्थित चालेल, तर घरीं शिक्षक ठेवण्याची जरूरी कोणासही भासणार नाहीं. मुलांचा शाळेंतला वेळ शिक्षणांत जात असेल, तर त्यांचा शाळेबाहेरचा वेळ शिक्षणांत गेला नाहीं तरी चालेल. इतकेंच नव्हे, तर तो शिक्षणांत घालविण्यांतही फारसा फायदा होणार नाहीं, किंबहुना तोटा होईल. मुलांस एकसारखें शाळेंत अडकवून ठेवणें चांगलें नाहीं, तसेंच त्यांस एकसारखें शिक्षणांत गुंतवून ठेवणेंही चांगलें नाहीं. सुतारानें कांहीं वेळ काम केल्यावर, कांहीं वेळ हत्यारें पाजवण्यांत घालविणें जसें चांगलें असतें, तसें मुलांनीं शाळेंत एकसारखे पांच सहा तास शिक्षणांत घालविल्यावर, त्यांसही थोडीबहुत विश्रांति मिळणें हिताचें असतें. याकरितां त्यांचा घरचा वेळ शिक्षणांत गुंतविणें चांगलें नाहीं. त्या वेळेचा व्यय मुलांस त्यांच्या इच्छेप्रमाणें करूं द्यावा. मात्र भलत्या गोष्टी त्यांनीं करूं नयेत, इकडे लक्ष असावें. खेळण्यापासून मुलांच्या प्रकृतीस हित होतें, याकरितां शारीरिक खेळांत तो वेळ त्यांनीं घालविल्यास, त्याबद्दल मनाई करण्याचें कारण नाहीं; मात्र त्यांच्या खेळापासून त्यांस किंवा इतरांस अपाय न होईल, इतकी खबरदारी घेण्याची व्यवस्था ठेवावी. ज्या ठिकाणीं

अशा फावल्या वेळांत, इतर विद्या म्हणजे सुतारकाम, लोहारकाम, कातकाम, इत्यादि प्रकारचें स्नायूंस व्यायामाप्रमाणें उपयोगीं पडणारें काम, शिकण्याची सोय असेल, त्या ठिकाणीं तें काम मुलांस शिकविल्यास अधिक फायदेशीर होईल; कारण त्यापासून व्यायाम होऊन, एखादी कलाही थोडीबहुत माहीत होण्याचा संभव असतो.

१६ हल्लींच्या शाळांत शिकवीत नाहींत, अशा कांहीं गोष्टी शिकविण्याकरितां, घरीं शिक्षक ठेवल्यास हरकत नाहीं. पण तो ठेवतांनाही आईबापांनीं पुष्कळ विचार करावा. जें शिक्षण मुलांस द्यावें असें आपल्यास वाटतें, तें मुलांच्या प्रकृतीस झेंपण्यासारखें आहे किंवा नाहीं, त्यापासून त्यांच्या प्रकृतीस इजा होईल कीं काय, त्याचा त्यांस कितीसा उपयोग होईल, त्यानें शाळेंतल्या शिक्षणास अडचण येईल कीं काय, तें शाळेंतल्या शिक्षणाशीं विरुद्ध होईल कीं काय, याचा आईबापांनीं विचार करावा. तें शाळेच्या शिक्षणापैकींच असलें, तर त्यांच्या बुद्धीस उगाच शीण देण्यांत अर्थ नाहीं. कारण तें शिक्षण दोन्ही ठिकाणचें सारखेंच असल्यास, त्यांपैकीं एकाकडे मुलांचें लक्ष लागेल व एकाकडे लागणार नाहीं. कारण जें शाळेंत शिकावयाचें, तें घरीं तयार झाल्यास, त्यांचें लक्ष शाळेंतील शिक्षणाकडे लागणार नाहीं, उलट प्रकार झाल्यास, घरच्या शिक्षणाकडे लागणार नाहीं. ज्ञानाचा सागर भरलेला आहे. त्यांतलें ज्ञान मुलांच्या हातीं लागेल तेवढें थोडेंच आहे. हें जरी खरें आहे, तरी मुलांची ताकद किती आहे, याचा आपण विचार केला पाहिजे. त्यांच्या ताकदीबाहेर शिक्षण त्यांच्यांत कोंबण्याचा प्रयत्न केल्यास, तें मावणार नाहीं. पोहरा पाण्यांत चार वेळ बुडविल्यानें, त्यांत चौपट पाणी मावणार नाहीं. एकवेळ भरलेला कोठें रिकामा करितां आल्यास गोष्ट वेगळी! पोट भरल्यावर जेवण जेवल्यास, तें बाधल्याशिवाय राहाणार नाहीं. विस्तवावर एकदम पुष्कळ जळवण दडपल्यास, तो पेटण्याच्या ऐवजीं मंदावण्याचा पुष्कळ संभव आहे, त्याप्रमाणेंच शाळेंतलें शिक्षण मुलांच्या पचनीं पडल्याशिवाय, त्यांस दुसरें शिक्षण देणें

फायदेशीर होणार नाहीं. याकरितां आईबापांनीं या गोष्टीचा नीट विचार करावा.

१७ शाळांतील–अर्थात् सरकारी शाळांतील–शिक्षण नियमांप्रमाणें–अर्थात् सरकारानें ठरविलेल्या नियमांप्रमाणें–चालणार, हें उघड आहे. पण ते नियम आपणांस योग्य वाटतील, तसे आईबापांस करून घेतां येतील. त्यांत ज्या उणीवा किंवा दोष असतील, त्यांबद्दल सरकारची खात्री केल्यास, सरकार त्याबद्दल विचार केल्याशिवाय राहाणार नाहीं. घरीं शिक्षक ठेवण्याचा प्रसंग टाळतां येईल तितका चांगला. घरीं शिक्षक ठेवल्यास मुलांचें स्वावलंबन नाहींसें होतें. तीं सर्व अभ्यास घरच्या शिक्षकापासून तयार करून घेतात, स्वतः कांहींच करीनाशीं होतात; व आयत्या पिठावर रेघा ओढणाऱ्या मनुष्यांप्रमाणें त्यांची स्थिति होते. घरच्या शिक्षकानें दिलेलें शिक्षण शाळेंतल्या शिक्षणाशीं जुळतें असल्यास, दुप्पट शिक्षण झालें नाहीं, तरी होईल तें शिक्षण दृढ तरी होईल, पण त्यांचें शिक्षण एकमेकांशीं मिळतें नसल्यास, **'मांजरांचें होतें भांडण पण उंदराचा जातो जीव'** त्याप्रमाणें शिक्षकांची आपल्या ज्ञानाबद्दलची बढाई, विद्यार्थ्यांच्या गळ्यास फांस लावूं लागावयाची! घरच्या मास्तरानें सांगावें, त्याचा मेळ शाळेंतल्या मास्तराच्या सांगण्याशीं पडावयाचा नाहीं, व शाळेंतल्या मास्तरानें सांगावें, त्याचा मेळ घरच्या मास्तराच्या सांगण्याशीं पडावयाचा नाहीं, असें पुष्कळ वेळ होतें. जगांत उपयुक्त ज्ञान कांहीं थोडें नाहीं. इतकेंचसें काय पण उपयुक्त नाहीं, असें ज्ञानच नाहीं. तरीपण मुलांची ग्रहणशक्ति पाहून व परिस्थिति मनांत आणून, त्यांतलें कोणतें ज्ञान किती द्यावयाचें याचा विचार करावा. दोघांचें शिक्षण दोन प्रकारचें असल्यास, ज्याप्रमाणें दोन बाजूंनीं दोन शक्तींचा समान दाब लागल्यास, पदार्थ जागच्या जागींच राहतो, किंवा निःशक्त बनतो, त्याप्रमाणें दोन शिक्षकांचें शिक्षण एकमेकांच्या विरुद्ध असल्यास, विद्यार्थ्यांच्या हातांत त्यांतलें मुळींच कांहीं न

लागण्याचाही संभव आहे! याकरितां होतां होई तों खासगी शिक्षक ठेवूं नये, हें चांगलें.

१८ पुष्कळ आईबापांस अशी संवय असते कीं, मुलें शाळेंतून आलेलीं दिसलीं, कीं त्यांनीं त्यांना दिलेंच कांहीं तरी काम लावून! हें करणें चांगलें कीं वाईट, हें सांगितलेल्या कामावर अवलंबून आहे. मुलें शाळेंतून आलीं म्हणजे तीं थकून भागून आलीं आहेत, हें मनांत ठेवून, त्यांस विशेष त्रास होणार नाहीं अशी काळजी मनांत बाळगून, फुरसतीच्या वेळीं सहज होणारीं कामें, किंवा त्यांस करमणूक होणारीं कामें, किंवा त्यांच्या शरीरास वेगळा व्यायाम देणारीं कामें, सांगितल्यास हरकत नाहीं. पण त्यांच्या थकलेल्या मनास अधिक थकवतील, किंवा त्यांच्या नेत्रादिकांस त्यांपासून अधिक त्रास होईल, अशीं कामें त्यांस सांगूं नयेत. त्याप्रमाणेंच, शाळेंतील अभ्यासाची तयारी करण्यास मुलांस कांहीं वेळ हवा असतो, तो त्यांचा वेळ न आडवणें चांगलें. कारण त्यांस योग्य तेवढा वेळ मिळाला नाहीं, म्हणजे त्यांचा शाळेंतला अभ्यास नीट होणार नाहीं; शाळेंतला अभ्यास नीट झाला नाहीं, म्हणजे तीं मागें राहून त्यांस शाळेंत जावेंसें वाटणार नाहीं; हळूहळू त्यांचें अभ्यासावरचें लक्ष उडेल, तीं अभ्यासांत मागें राहातील, व त्यांस शाळेचा कंटाळा येईल.

१९ कितीएक आईबाप, मुलांस शाळेंत लागणाऱ्या सामानाची व्यवस्था नीट लावीत नाहींत, पण हें बरोबर नाहीं. मुलांस वाचनपुस्तक नसेल, तर त्यांचें वाचन तयार कसें होईल? कागद नसतील, तर सांगितलेल्या गोष्टींचें त्यांस टिपण कसें करितां येईल? मुलांस सामुग्रीचा पुरवठा पूर्ण असावा. अमुक नाहीं म्हणून हा माझा अभ्यास तयार झाला नाहीं, अशी तक्रार मुलांस करावयास सांपडणें चांगलें नाहीं. दिवसेंदिवस शिक्षणाचे विषय वाढल्यामुळें, व शिक्षणाची पद्धति बदलल्यामुळें, मुलांस साहित्य फार लागतें, हें खरें, पण तें त्यांस आईबापांनीं न पुरविल्यास, मुलांचे शिक्षणांत तेवढा व्यत्यय आल्याशिवाय राहाणार नाहीं. जें सामान

त्यांस लागणार, तें सर्व घेण्याचें आपल्यास सामर्थ्य नसेल, तर त्या सामानांत निवड करावी, व त्यापैकीं विशेष अगत्याचें असेल तें आधीं घ्यावें. शब्दार्थांचीं पुस्तकें व सोडविलेलीं उदाहरणें, असलीं पुस्तकें न घेणें चांगलें. असलीं पुस्तकें घेण्याबद्दल केव्हां केव्हां शिक्षकच आग्रह करितात, असें दिसून येतें, पण तें केव्हांही फायदेशीर नाहीं. शिक्षकानें मुलांस शब्दांचे अर्थ सांगावे, व त्यांनीं ते लिहून घ्यावे. म्हणजे त्यांस शब्द लिहिण्याची संवय होते व शब्द पाठ करण्यासही एक प्रकारची मदत होते. ते शब्द शिक्षकानें तपासून पाहावे, म्हणजे मुलांस शुद्धलेखन सहज कळूं लागतें. हे फायदे आयते शब्दार्थ घेतल्यानें होणार नाहींत. सोडवलेलीं उदाहरणें जवळ असलीं, म्हणजे त्या उदाहरणांच्या रीती पाहाण्याकडे सहजच प्रवृत्ति होते, व त्यामुळें स्वतां कल्पना चालवण्याकडे विद्यार्थ्यांचें चित्त वळत नाहीं. ते केवळ घोंकीव काम करणारे विद्यार्थी बनतात. उदाहरणांत थोडासा बदल झाला, कीं तें उदाहरण त्यांस येत नाहीं, किंवा शिकलेल्या रीतीही त्यांस वेळेवर हात देत नाहींत. आपलें आपण उदाहरण सोडवण्यांत जो आनंद आहे, त्याचा लाभ त्यांस केव्हांही होत नाहीं, यामुळें एका मोठ्या मानसिक शक्तीची उणीव, त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होते. याकरितां सोडवलेलीं उदाहरणें घेण्याची विद्यार्थ्यांची प्रवृत्ति अगदीं बंद करावी. इतिहास, भूगोल, व्याकरण, या विषयांचीं टिपणें घेणें, किंवा कवितांच्या अन्वयार्थांचीं पुस्तकें घेणें, हेंही याप्रमाणेंच वाईट आहे. शिक्षकांनीं ते ते विषय सांगितल्यावर, विद्यार्थ्यांनीं आपण स्वतां त्यांचीं टिपणें आपल्या सोईप्रमाणें तयार केल्यास, ती गोष्ट वेगळी.

२० आईबाप सुशिक्षित असोत किंवा नसोत, त्यांनीं आपल्या मुलांच्या शिक्षणावर ठेवतां येईल तेवढी नजर ठेवावी. अशिक्षित असल्यास त्यांस कांहीं शिकवितां येणार नाहीं, व येत नसेल तर त्यांनीं शिकवूं नये. पण आपला मुलगा अभ्यास करावयास बसतो किंवा नाहीं, यावर नजर ठेवावी. तो आपला वेळ भलती-

कडे दवडीत असल्यास तसा वेळ त्यास दवडूं देऊं नये. त्यास रात्रीं अभ्यासास बसण्यास भय वाटत असेल, तर आपण त्यास सोबत करावी, त्याची करमणूक करावी, त्याला चांगला अभ्यास करण्यास उत्तेजन द्यावें, ह्मणजे त्यास अभ्यास कंटाळवाणा होणार नाहीं. सुशिक्षित आईबापांस, आपल्या मुलांस पाहिजे तेवढी मदत करतां येईल, व ती करण्यास त्यांनीं आळस करूं नये; मुलांस मदतीची फार अपेक्षा असते. वेळच्यावेळीं केलेली अल्पस्वल्प मदतही त्यांस फार उपयोगीं पडते. आह्मांस वेळ होत नाहीं, आमचेंच काम आह्मांस उरकत नाहीं, अशी पुष्कळ आईबापांची कुरकुर असते, व ती पुष्कळ वेळां खरीही असते; पण आपल्या संततीचें शिक्षण ही फार महत्वाची बाब आहे, संततीचें पुढील आयुष्यक्रमण सुखाचें किंवा दुःखाचें होणें, बऱ्याच अंशीं या वेळच्या शिक्षणावर अवलंबून असतें, याकरितां त्याची हयगय करणें चांगलें नाहीं. तें आपलें एक अवश्य कर्तव्य आहे, असें मनांत बाळगून करितां येईल तेवढी मदत आपल्या संततीस करीत जावी; ह्मणजे तें एक आनंददायक कर्तव्य आहे असें त्यांस वाटूं लागेल, व मुलांच्या संगतींत गेलेला वेळ फुकट गेला नाहीं, सार्थकीं लागला, असें त्यांस वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

२१ मुलांस शाळेंतला धडा वाचावयाचा असला, तर तो वाचतांना आपण जवळ बसावें. तीं वेडें वांकडें वाचूं लागल्यास त्यांच्या चुका दुरुस्त कराव्या, धडा समजून सांगावा, विशेष गोष्टी कोणत्या, लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी कोणत्या, इकडे त्यांचें लक्ष लावावें. आपल्यास वेळ असेल, व त्यांसही फारसें काम नसेल, किंवा तीं फारशीं थकलेलीं नसतील, अशा वेळीं आपण त्यांस बोधपर गोष्टी सांगाव्या किंवा वाचून दाखवाव्या, आपल्या पूर्वजांचा इतिहास सांगावा. **भारत, रामायण,** इत्यादि ग्रंथांतील कथा सांगाव्या. उत्तम उत्तम चित्रें त्यांस दाखवावीं. त्यांची सदभिरुचि जागृत करावी. उत्तम कवि व ग्रंथकार यांच्या चांगल्या चांगल्या कृतीशीं त्यांचा परिचय करून द्यावा. सवड असेल तर त्यांस फिरावयास

न्यावें, ऐतिहासिक स्थळें दाखवावीं, सृष्टिवैभव पाहाण्याची त्यांस संवय लावावी; प्रसंगानुरूप सद्गुणांचें पोषण होईल व दुर्गुणांचा वीट येईल असा उपदेश करावा. शाळेंतल्या शिक्षणास अडथळा न आणतां साधणारीं संसाराचीं कामें, हस्तकौशल्याचीं कामें, आंगमेहनतीचीं कामें, त्यांजकडून सवडीसवडीनें करवावीं. मुलें केवळ पोकळ डौल दाखविणारीं न व्हावीं, बोलण्यापेक्षां करण्याकडे त्यांचा अधिक ओढा असावा, याकरितां आईबापांनीं अवश्य प्रयत्न करावा.

२२ एकाच तऱ्हेच्या शिक्षणांत, मुलांस फार वेळ गुंतवून ठेवणें चांगलें नाहीं. कारणापुरतें आरंभींचें शिक्षण झाल्यावर, ज्या धंद्यांत त्यांस घालावयाचें असेल, त्या धंद्याचें शिक्षण त्यांस मिळावें, याकरितां वेगळी योजना करणें शक्य असेल, तर तसें करणें अधिक चांगलें. हल्लीं नुसत्या बुद्धिशिक्षणावर सर्वांचाच भर दिसतो, तो चांगला नाहीं. सर्वच मुलें नुसत्या कारकुनी विद्येंत प्रवीण होऊन उपयोग काय? एवढ्या कारकुनांस संभाळणारे यजमान कोठून आणावयाचे? सर्वच पंडित, ग्रंथकार, तत्ववेत्ते, किंवा कवि होऊन तरी काय उपयोग? **'निराश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लताः'** पंडित, स्त्रिया व वेली आश्रयाशिवाय शोभत नाहींत. तेव्हां असलें एकांगी शिक्षण उपयोगी नाहीं. तें पूर्ण असावें. त्यांत सर्व प्रकारच्या शिक्षणाकडे सारखें लक्ष असावें. त्या शिक्षणापासून स्वतंत्र धंदा करणारीं माणसें उत्पन्न व्हावीं; कारकुनांस कामावर लावणारे यजमान त्याच शिक्षणापासून उत्पन्न झाले पाहिजेत; कवींस, ग्रंथकर्त्यांस आश्रय देणारे, त्यांतूनच उत्पन्न झाले पाहिजेत. मुलें बुद्धिवान झालीं, पण त्यांचें मन त्यांच्या ताब्यांत राहिलें नाहीं, किंवा आपल्या बुद्धीचा प्रभाव जगास दाखवण्यापुरतें शरीरसामर्थ्यच त्यांच्यांत नसलें, तर त्यांच्या बुद्धीचा उपयोग काय? किंवा नुसती शारीर शक्ति वाढून त्यांच्या पोटापुरतेंही त्यांस मिळविण्याचें सामर्थ्य नसलें, तर त्यांच्या नुसत्या शक्तीचें तरी काय करावयाचें? याकरितां मुलांस शिक्षण देतांना, लहानपणापासून त्यांच्या शारीरिक, मान-

सिक, वगैरे सर्व शक्तींस उत्तेजन मिळेल, अशी शिक्षणपद्धति असण्याची आईबापांनीं काळजी घ्यावी.

२३ व्यवहारांत मनुष्याचा उपयोग होण्यास, त्याच्या सर्व शक्ति दृढ झालेल्या असाव्या लागतात. नुसता सशक्त मनुष्य हमालासारखा राबेल, पण साधारण हिशोब त्यास कळणार नाहीं. नुसता बुद्धिवान मनुष्य ते हिशोब भराभर करील, पण चार कोस चालण्याचा प्रसंग आल्यास त्यास अवघड लागेल; ज्याचें मन विचारानें मोठें झालें नाहीं, त्यास साधारण विघ्नें किंवा संसारांतील बारीकसारीक प्रसंगही उद्विग्न करून टाकतील; याकरितां सर्वांगपूर्ण शिक्षण मिळण्याची फार जरूर आहे. आतां इतकें जोमाचें शिक्षण सर्वांस मिळवितां न आलें, तरी त्यांतलें एकच अंग जोरदार होऊन बाकीचीं अशक्त राहाणें किंवा लुलीं असणें चांगलें नाहीं. याकरितां एखादें अंग जोमदार व बाकीचीं अंगें कार्यक्षम तरी असलीं पाहिजेत. मग जें जोमदार असेल, त्याला अनुकूळ अशा धंद्यांत त्या मुलाला घालतां येईल. म्हणजे तो धंदा त्यास ताप देणारा होणार नाहीं, सुखकर होईल. धार्मिक बुद्धीच्या मनुष्यास वकीली करावयास लावल्यास, त्याच्या बुद्धीचा उपयोग होणार नाहीं. सर्वच मुलांस एकसारखें शिक्षण देण्यापेक्षां, त्यांच्या शक्तीची पारख करून, योग्य धंद्याकडे त्यांची निवड केल्यास, तें संततीस फायदेशीर झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

२४ हल्लीं सर्व मुलांची शिक्षणपद्धति एकसारखी झाली आहे, ही मोठ्या फायद्याची गोष्ट आहे, असें आरंभीं वाटतें. पण त्यांतही फायद्याबरोबर तोटे आहेतच. प्रारंभींचें सर्व शिक्षण सर्व मुलांचें एकसारखें असलें तरी चालेल, पण तें शेवटपर्यंत एकसारखें असणें कोणत्याही दृष्टीनें हितावह होणार नाहीं. हल्लीं, न्हावी, शिंपी, सोनार, कासार, सर्वजण एकसारखें शिकून, आपल्या धंद्यास सारखेच निरुपयोगी बनून, कारकुनीच्या मागें एकसारखे लागले आहेत; यामुळें कारकुनीचें महत्व कमी झालें आहे, व स्वतंत्र व जातीजातीचे धंदे अवनतीस पोंचले आहेत. सर्वच मंडळी चाकर,

धनी कोणासच होतां येत नाहीं, ही स्थिति समाधानकारक नव्हे. थोडेंसें आरंभींचें शिक्षण झाल्यावर, पुढें ज्या धंद्यांत शिरावयाचें असेल, त्याला उपयोगीं पडणारें शिक्षण प्रत्येकास मिळेल, तर त्याला आपला धंदा ऊर्जितावस्थेस आणतां येईल; त्यांत सुधारणा करतां येईल; व तो धंदा आपल्या मुलांबाळांस फायदेशीर करून दाखवितां येईल.

२५ उमेदवारी हल्लीं अगदीं बुडाल्यासारखी झाली आहे. पण आपणांस जो धंदा करावयाचा, त्या धंद्यांत उमेदवारी करणें अत्यंत फायद्याचें आहे. याकरितां शिक्षण संपल्यावर, अनुभविक मनुष्यांच्या हाताखालीं कांहीं दिवस अवश्य उमेदवारी करावी. कोणताही धंदा चांगल्या रीतीनें साधण्यास, त्यांतील जुन्या लोकांचा अनुभव आपणांस कळण्याची फार आवश्यकता असते, याकरितां आईबापांनीं आपल्या मुलांस, ज्या धंद्यांत घालावयाचें असेल, त्या धंद्यांत वाकब असणाऱ्या मनुष्यांच्या हाताखालीं, कांहीं दिवस उमेदवार म्हणून ठेवण्यास, आळस करूं नये. पुष्कळ नव्या मनुष्यांची—अनुभव नसतांना धंदा आरंभल्यामुळें—घांदल झालेली आपल्यास आढळते, याचें कारण उमेदवारीचा अभाव हें होय.

२६ मुलांस पुढें जो उद्योग करावयाचा, त्याचें शिक्षण मिळालें पाहिजे. शिकून तयार झाल्यावर, 'आतां मी काय करूं' असा प्रश्न उत्पन्न होऊन, त्यांस अडचण वाटतां उपयोगीं नाहीं. अशी अडचण वाटत असेल, तर त्यांस मिळालेलें शिक्षण हें खरें शिक्षण नव्हे, असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. नुसती मानसिक उन्नति झाल्यानें काम भागत नाहीं. आपल्या निर्वाहाचा भार कोणावर न घालतां, तो आपला आपण उचलूं, अशी धमक संततीच्या आंगांत शिक्षणानें उत्पन्न झाली पाहिजे. अमुक मार्गानें मी गेलों, म्हणजे माझा निर्वाह मला करतां येईल, अशी धमक त्यांच्या आंगांत उत्पन्न झाली पाहिजे. त्या मार्गानें जातांना जे कष्ट पडतील, ते सोसण्यासारखें त्यांचें मन व शरीर हीं तयार असलीं पाहिजेत. वाटेंत येणारे अडथळे टाळण्याकरितां, व नवे-

नवे उपाय शोधून काढण्याकरितां, त्यांस उपाय शोधितां आले पाहिजेत. एका उद्योगांत तनमन घातल्याशिवाय, या गोष्टी साधावयाच्या नाहींत.

२७ कोणताही खर्च न पडतां सृष्टीपासून मिळणारें सुख, त्यांस भोगतां आलें पाहिजे. आपलें जन्म केवळ दुःख भोगण्याकरितां झालें नाहीं, किंवा कसेंतरी फुकट घालवण्याकरितां झालें नाहीं, हें त्यांस कळलें पाहिजे. आपला निर्वाह केला ह्मणजे आपल्या जन्माचें सार्थक झालें, अशाप्रकारचे त्यांचे कोते विचार दूर झाले पाहिजेत. यापेक्षां पुष्कळ गोष्टी आपल्यास करावयाच्या आहेत, असें त्यांस वाटलें पाहिजे. स्वजन, समाज, देश, राष्ट्र याबद्दल बरोबर कल्पना त्यांच्या मनांत उत्पन्न झाली पाहिजे. त्यांचें हिताहित कोणत्या गोष्टींत आहे, त्या संबंधानें आपलें कर्तव्य काय आहे, तें आपणांस कसें बजावतां येईल, त्याकरितां आपण काय केलें पाहिजे, हें त्यांस कळलें पाहिजे. स्वकर्तव्याची पुरती ओळख त्यांस झाली पाहिजे, व तें शक्त्यनुसार बजावण्यास तीं तयार झालीं पाहिजेत. ह्मणजे हें वर्तन किंवा कर्तव्य त्यांच्या मनांत बिंबेल, अशा प्रकारचें शिक्षण त्यांस मिळालें पाहिजे. कोणी यास उदार शिक्षण असें ह्मणतात. ह्मणजे शिक्षणानें मुलांचें मन उदार झालें पाहिजे, व त्यांची प्रवृत्ति सदाचाराकडे झाली पाहिजे. **मिल्टन** यानें उदार शिक्षणाची व्याख्या अशी लिहिली आहेः—'ज्या शिक्षणाच्या योगानें मनुष्यास आपलें गृहसंबंधीं व सार्वजनिक कर्तव्य नेकीनें, अकलेनें, आणि उदारबुद्धीनें करितां येईल, त्यालाच पूर्ण आणि उदार शिक्षण ह्मणावें.'

**जीवितकर्तव्य**–पृष्ठ १३६ पाहा.

२८ गृहसंबंधीं कर्तव्य जो तो बजावीत असतोच. पण तेंही जसें हवें तसें थोड्याच ठिकाणीं बजाविलें जातें. संसाररूप रथाचीं स्त्री आणि पुरुष हीं दोन चक्रें आहेत. तीं संसाराचा गाडा ओढीत असतात. पण तो ओढतांना एकाच चाकास जास्त श्रम पडूं नयेत, उभय चाकांचें घर्षण होऊं नये. या गोष्टींकडे लक्ष असलें पाहिजे. पति व पत्नी यांणीं एकमेकांस सौख्य होईल अशा

रीतीनें वागावें, एकमेकांच्या सहवासानें त्यांच्यांत प्रेम उत्पन्न व्हावें, त्यांनीं एकमेकांकरितां झीज सोसावी, दोघांचा एक जीव व्हावा, प्रपंचांत कांहीं वेळ त्यांची गांठ पडली आहे, तोंपर्यंत त्यांणीं एकमेकांकरितां जीव कीं प्राण करावा. परमेश्वरकृपेनें त्यांस संतति लाभल्यास तिच्यावर त्यांणीं प्रेम करावें, व त्यांच्या संसाराची जुळणी जुळवेल तेवढी जुळवून ठेवावी, पुढें मागें त्यांची तुटातूट होण्याची वेळ ईश्वरेच्छेनें आल्यास, जें मागें राहील त्यानें सद्वर्तनानें राहून मागील कर्तव्यें पुढें चालवावीं, संसारांतील सुखदुःखांचा अनुभव समान भावानें घ्यावा, त्याबद्दल विषाद मानूं नये, अशा-रीतीनें तीं वागलीं म्हणजे त्यांनीं आपलें गृहसंबंधीं कर्तव्य नीट बजाविलेंसें होईल. या सर्व गोष्टी आपल्या संततीस आपल्या उदाहरणानें शिकवाव्या. हें काम इतरांस व्हावयाचें नाहीं.

२९ सार्वजनिक कर्तव्याबद्दल पुष्कळ लोकांची चांगलीशी समजूत झालेली नसते. परंतु दिवसेंदिवस हें अज्ञान आपल्या नाशास कारण होऊं लागलें आहे. या बाबतींतलें अज्ञान नाहींसें करण्याचा आईबापांनीं अवश्य प्रयत्न करावा. पूर्वींच्या ग्रामसंस्थांचा हल्लीं लोप झाला आहे. गांवांतील प्रत्येक व्यक्ति हल्लीं पूर्ण स्वातंत्र्य अनुभवीत आहे. सार्वजनिककाम म्हणजे दहांचें काम, म्हणजे तें कोणाएकाचेंही काम नाहीं, अशी हल्लीं समजूत झाल्यासारखी दिसते, ती बरोबर नाहीं. प्रत्येक व्यक्तीचें मत वेगळें. कोणाचें कोणाशीं पटत नाहीं. कोणी कोणाचें ऐकत नाहीं. यामुळें समाजाकडून एकमेकांच्या हिताचें एकही काम होत नाहीं. प्रत्येक गोष्टींत सरकारच्या तोंडाकडे पाहात बसण्याची वाईट चाल लोकांस लागत चालली आहे. सरकारच्या मदतीची अपेक्षा करणें वाईट नाहीं, पण सरकार करील तरच कांहीं होईल, नाहींतर एकही गोष्ट होणार नाहीं, असा प्रकार कांहीं चांगला नाहीं.

३० सरकारास पुष्कळ मोठमोठीं कामें करावयाचीं असतात. आपण एखाद्या कामाची पूर्व तयारी करून, मग सरकारी मदत मागितल्यास सरकारास मदत करण्यासही ठीक पडेल. आपण

केवळ परावलंबी बनणें चांगलें नाहीं. राजाची सत्ता मोठी आहे, पण प्रजेजवळ जी अल्पसत्ता आहे, ती एकवट करून प्रजेनें राजास मदत करणें, किंवा आपल्या समाजास उपयोगीं पडणारीं कामें आपण स्वतां करूं लागणें, कांहीं वाईट नाहीं. सर्व प्रजा निर्माल्यवत् झाल्यास, तिचा परिणाम जनतेस तसा राजसत्तेसही घातकच होईल. प्रजेनें आपली अल्पशक्ति एकत्र करून, '**थेंबें थेंबें तळें सांचे**' या न्यायानें, तिच्यापासून मोठें कार्य करण्याची आमची परंपरागत चाल, सोडून देणें चांगलें नाहीं. आपल्या हिताच्या गोष्टी कोणत्या, अहिताच्या गोष्टी कोणत्या, हिताच्या गोष्टी करण्याकरितां सरकारापासून मदत मिळवावयाची, अहिताच्या गोष्टी सरकार करीत आहे असें वाटल्यास, एकमतानें आपलें ह्मणणें सरकाराच्या कानावर घालावयाचें, हें करण्यास भिण्याचें कारण नाहीं.

३१ सरकार ज्या गोष्टी करतें, त्या रयतेच्या हिताकरितां करतें, पण केव्हां केव्हां त्या फाजील लाड करणाऱ्या आईबापांच्या कृत्याप्रमाणें असण्याचा संभव असतो. अशा वेळीं त्यांतील कमतरपणा, रयतेनें एकमतानें सरकारास दाखवावा व दुरुस्त करून घेण्याचा प्रयत्न करावा. आमच्या समाजाच्या सुखास कोणत्या गोष्टी कारण आहेत, कोणत्या नुसत्या भ्रामक आहेत; सरकारची मदत कोणत्या गोष्टींकरितां मागावयाची; आपल्या आपण कोणत्या गोष्टी करावयाच्या; समाजाचें ऐक्य व्हावें ह्मणून काय केलें पाहिजे, स्वदेश ह्मणजे काय, स्वदेशप्रीति ह्मणजे काय, त्याकरितां आपण काय केलें पाहिजे, याबद्दल आपण पूर्ण माहिती करून घ्यावी; व समाजसुखाकरितां समाजानें एकवटून काम करण्याची आपली संवय वाढवावी.

३२ सरकारी कामें सरकारी कामदारांच्या धोरणानें चालावयाचीं. त्यांचें धोरण रयतेच्या धोरणाशीं नेहमीं मिळेलच, असें म्हणतां येणार नाहीं. एखाद्या ठिकाणीं पटकीसारख्या घातक रोगानें प्रवेश केल्यास, त्या रोगाचा प्रतिबंध करण्याची सरकारची तयारी होतां होतां व वरिष्ठ अंमलदारांकडे रिपोर्ट जातां येतां, बराच वेळ लागतो, पण लोकांनीं मनांत आणल्यास, त्यांस एकम-

तानें प्रतिबंधक उपाय तावडतोब योजितां येतील. याकरितां सामाजिक कामें एकजुटीनें कशीं करावीं, याचें शिक्षण संततीस मिळणें अगत्याचें आहे. तें शाळेंत मिळेल तर सर्वांत उत्तम. कारण सर्व प्रकारचें शिक्षण देण्याचें खरें स्थान म्हणजे शाळाच! असें दुसरें ठिकाण कोणतें आढळणार? पण तसें शिक्षण शाळेंत मिळत नसेल, तर तें तसें तेथें मिळावें, याकरितां आईबापांनीं प्रयत्न करावे; नाहींतर आपण स्वतां तें द्यावें.

२३ एवढ्यानेंही आईबापांचें कर्तव्य संपत नाहीं. त्यांस याहीपेक्षां मोठें एक काम करावयाचें आहे, तें धर्मशिक्षणाचें. आपला धर्म म्हणजे काय, त्याची योग्यता किती आहे, तो आपण कां पाळावा, त्यांतील उत्तम तत्वें कोणतीं, तीं आपल्यास योग्य रीतीनें कशीं पाळतां येतील, त्यापासून आपल्या जन्माचें सार्थक कसें करून घेतां येईल, याबद्दल आपल्या संततीस योग्य शिक्षण मिळालें पाहिजे. त्याची तजवीज शाळांतून थोडथोडी करतां येईल, तसें न जमल्यास तें काम आईबापांनीं बजाविलें पाहिजे. धर्म म्हणजे ढोंग नव्हे. बाहेरचें वर्तन किंवा शुद्धीकरण हा धर्माचा एक भाग म्हणतां येईल, पण तो धर्माचा जीवात्मा नव्हे. धर्माची मदार बाह्य देखाव्यावर नाहीं. तेथें अंतरंगाचें काम आहे. अंतरंग थोर कसें होईल, निर्मळ कसें होईल, त्याच्या द्वारें आत्म्याचें व परमात्म्याचें ज्ञान कसें होईल; आपला देह म्हणजे काय, जन्ममृत्यु म्हणजे काय, जन्म कशाकरितां मिळाला आहे, त्याचें सार्थक कसें होईल, तें करण्याचा मार्ग कोणता; आपल्यास जन्म कोणीं दिला, आपलीं येथलीं कर्तव्यें कोणतीं, या लोकीं आपल्यास अक्षय राहावयाचें आहे किंवा कांहीं काळ मात्र राहावयाचें आहे; परलोक म्हणजे काय, तेथें आपण कसे पोंचूं, परलोकसाधनाचीं कर्तव्यें कोणतीं, जग हें काय आहे, तें कसें चाललें आहे, वगैरे ज्या गोष्टी मनुष्याच्या मनास अगदीं गोंधळून सोडतात, त्यांच्या ज्ञानाचा मार्गही त्यांस होईल तेवढा खुला करून दिला पाहिजे. तात्पर्य इतकेंच कीं, आपल्या संततीला सर्व प्रकारें धन्य करण्याचे

प्रयत्न, आपल्याकडून जितके होणें शक्य असतील, तितके आपण अवश्य करावे. म्हणजे आपण आईबापांनीं मुलांसंबंधीं बजावण्याची कामगिरी यथास्थित बजावली, असें होईल. याकरितां मुलांच्या सर्व प्रकारच्या शिक्षणाची नीट व्यवस्था, आपल्या हातून होईल तेवढी बजावण्याचा, आईबापांनीं प्रयत्न करावा.

---

## भाग ४–विवाह.

१ आईबापांनीं मुलांस वाढवावें, त्यांस शिकवून तयार करावें, त्यांस एखाद्या धंद्याचें शिक्षण द्यावें, हें सर्व चांगलें आहे; पण त्यांचा विवाह आईबापांनीं करावा किंवा नाहीं, हा मोठा प्रश्न आहे. प्रश्न तर खराच. दोन्ही बाजूंला पुष्कळ कारणें दाखवितां येतील. दोन्ही प्रकारांत नफेतोटे आहेतच, पण आपल्या समाजांत ही चाल रूढ कां झाली, याचा आपण थोडासा विचार करूं. प्रत्येकानें परिस्थितीकडे लक्ष दिल्यास व सारासार विचार केल्यास, हा प्रश्न आपल्यास मोठी नड करील असें नाहीं.

२ मुलांचीं लग्नें करण्याबद्दल धर्मशास्त्राचें काय मत आहे, तें आपण प्रथम पाहूं. विद्यार्थ्यानें विद्या पुरी झाल्यावर गुरूच्या आज्ञेनें विवाह करावा, असें **मनुस्मृतींत** सांगितलें आहे, पुढील श्लोक पाहाः—

**गुरुणानुमतः स्नात्वा समावृत्तो यथाविधि।**
**उद्वहेत द्विजो भार्यां सवर्णां लक्षणान्विताम्॥**

**मनु.**—अ. ३ श्लो. ४

"ब्रह्मचारी द्विजानें गुरूच्या अनुमतीनें यथाविधि (आपला) समावर्तनविधि करून आपल्या वर्णांतील शुभ लक्षणांनीं युक्त अशी स्त्री वरावी."

या श्लोकावरून विवाहास गुरूची आज्ञा पाहिजे, हें उघड दिसतें. विवाहाच्या पूर्वी सर्व विद्या संपली पाहिजे, निदान विद्येचा काळ तरी संपला पाहिजे, असें उघड दिसतें; पण विवाह ज्याचा त्यानें करावा,

असें यावरून उघड होतें. विवाहास गुरूची आज्ञा पाहिजे, पण विवाह गुरूनें करावयाचा नाहीं; तो बापानें करावा, असाही या श्लोकांत उल्लेख नाहीं.

३ जेव्हां गुरूच्या गृहीं राहून विद्या करावी, या गोष्टीचा लोप झाला; व गुरूवर असणारा विद्येचा भार नाहींसा होऊन तो बापावर पडला, तेव्हां कोठें कोठें बापाकडे गुरुत्वही आलें, हें मागें सांगितलेंच आहे. त्यामुळें गुरूच्या आज्ञेच्या ठिकाणीं बापाची आज्ञा घेण्याची वेळ आली, व त्यामुळें पुढें पुढें बापच मुलाचा विवाह करूं लागला.

४ पेशवाईंत श्रीमंत लोकांत लहानपणीं लग्न करण्याची चाल अधिक रूढ झाली असावी, व तिचें अनुकरण हळू हळू इतर लोकांत झालें असावें, असें वाटतें. एक दोन पिढ्यांच्या पूर्वी पुष्कळ पुरुषांचीं लग्नें थोरपणीं होत, व पुष्कळ पुरुष अविवाहित राहात. अलीकडे मुलांचीं लग्नें फार लौकर होत नाहींत, मुली साधारण मोठ्या होतात; लग्नें होतांच त्यांला बहुधा ऋतुप्राप्ति होते व समाजांत अविवाहित फारसा कोणी राहात नाहीं.

५ हल्लीं ज्याप्रमाणें मुलीच्या लग्नाची काळजी बापास असते, त्याप्रमाणें—थोड्या कमी प्रमाणानें—मुलाच्या बापास मुलाच्या लग्नाविषयींही काळजी वाटत असते. यामुळें हल्लीं बहुतेक मुलांमुलींचे विवाह आईबापांनींच करावयाचे, असें बहुतेक ठाम ठरल्यासारखें झालें आहे. याला थोडाबहुत अपवाद दृष्टीस पडतो, नाहीं असें नाहीं, पण त्याचें प्रमाण मोठें नाहीं. विद्या होईपर्यंत तरी विद्यार्थ्यांनीं अविवाहित राहावें, असें हल्लीं कित्येकांस वाटूं लागलें आहे, पण त्याचा परिणाम समाजावर फारसा झालेला दिसत नाहीं. बराचसा हुंडा मिळाला म्हणजे बऱ्याच जणांची धांदल उडते, व विवाह उरकून घेण्यांत येतो. **आनीबीझांट**बाईच्या **बनारस** येथील कालेजांत विवाहितांस घेत नाहींत, व हल्लीं बंद झालेल्या **समर्थविद्यालयां**त विवाहितांस घेत नसत, असें ऐकिवांत आहे. अविवाहित राहाण्याकडे पुष्कळांचा कल व्हावा, याकरितां

विवेकानंदासारख्यांनीं पुष्कळ श्रम केले आहेत; पण अद्याप या गोष्टीला विशेष यश आलेलें नाहीं.

६ मुलांच्या लग्नाविषयीं धर्मशास्त्राचें मत आपण पाहिलें. मुलींच्या लग्नाविषयीं त्याचें मत काय आहे, तें आतां पाहूं.

स्त्रीनें स्वातंत्र्यानें राहूं नये, कोणाच्यातरी आश्रयानें राहावें, असें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**बाल्ये पितुर्वशे तिष्ठेत्पाणिग्राहस्य यौवने ।**
**पुत्राणां भर्तरि प्रेते न भजेत्स्त्री स्वतंत्रताम् ॥**

**मनु.**—अ. ५ श्लो. १४८.

"स्त्रियेनें बाल्यावस्थेंत पित्याचे आधीन राहावें. तारुण्यावस्थेंत भर्त्याच्या आधीन राहावें, भर्ता मृत असतां पुत्रांचे आधीन राहावें. (पुत्रांच्या अभावीं सपिंड बांधवांच्या आधीन राहावें. त्यांच्या अभावीं आपल्या पितृपक्षाच्या आधीन राहावें, भर्तृपक्ष व पितृपक्ष या दोहोंच्या अभावीं राजाच्या आधीन राहावें,) कदापि स्वातंत्र्यानें राहूं नये."

७ दुसरा श्लोक **'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति'** स्त्रीला स्वतंत्रपणा योग्य नाहीं असा आहे. यावरून मुलीचा विवाह करणें हें बापाच्या कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य ठरलें. कारण, मुलीला लहानपणीं बापानें रक्षावयाचें, व तरुणपणीं तिला भर्त्याच्या स्वाधीन करावयाचें, यामुळें तिचें लग्न करणें हें सहजच त्याचें कर्तव्य झालें. ऋतुप्राप्तीनंतर विवाह करणें अप्रशस्त व धर्मबाह्य ठरल्यामुळें, तिचें लग्न लहानपणीं करणें अगत्याचें होऊन बसलें. मुलीचें लग्न करावयाचें म्हणजे तिला वर शोधिलाच पाहिजे. मुलांचीं लग्नें बाप मागें सांगितल्याप्रमाणें आपल्या विचारानें करूं लागले. याकरितां मुलांमुलींचीं लग्नें करणें हें एक आईबापांचें कर्तव्य होऊन बसलें.

८ लग्नाशिवाय मुलगी राहाणें ठीक नाहीं, असें वाटूं लागल्यामुळें, व मुलीस चांगलें स्थळ मिळावें या बापाच्या अनिवार इच्छेनें, पुढें पुढें हुंड्याचे दर आपोआप वाढत चालले. समाजांत मुली

अविवाहित राहूं नयेत, असें वाटूं लागल्यामुळें बहुतेक मुलांचीं लग्नें होऊं लागलीं, व अविवाहित पुरुष राहात नाहींसे झाले. सर्वांचा एकसारखा क्रम चालू झाल्यामुळें, सर्व संसारी, सर्व पोटाच्यामागें लागलेले, सर्वच स्वतांकडे व स्वतांच्या कुटुंबाकडे पाहाणारे, होऊं लागले. समाजांत परमार्थपर माणसें आढळतनाशीं झालीं!

९ अमुक प्रकारच्या मुलींशीं लग्नें करूं नयेत, असें **मनूनें** सांगितलें आहे. तेव्हां तशाप्रकारच्या मुली लग्नाशिवाय राहिल्या पाहिजेत, पण त्या राहिल्याचा दाखला फारसा सांपडत नाहीं. बहुधा सर्व मुलींचीं लग्नें झालीं पाहिजेत, असा हल्लींचा समज दिसतो. **मनु** काय म्हणतो पाहाः—

**नोद्वहेत्कपिलां कन्यां नाधिकांगीं न रोगिणीम् ।**
**नालोमिकां नातिलोमां न वाचाटां न पिंगलाम् ॥ ८॥**
**नर्क्षवृक्षनदीनाम्नीं नांत्यपर्वतनामिकां ।**
**न पक्ष्यहिप्रेष्यनाम्नीं न च भीषणनामिकाम् ॥ ९ ॥**
**यस्यास्तु न भवेद्भ्राता न विज्ञायेत वा पिता ।**
**नोपयच्छेत तां प्राज्ञः पुत्रिकाधर्मशंकया ॥ ११ ॥**

**मनु**—अ. ३ श्लोक ८ ते ११.

"(पिंगटकेशयुक्त,) अधिक अवयवयुक्त, नित्य रोगी, लोम (केश) रहित, अतिलोमयुक्त, वाचाट (अतिकर्कश भाषण करणारी,) पिंगटनेत्रयुक्त, अशी कन्या वरूं नये. ऋक्ष म्हणजे नक्षत्र तन्नाम्नी, (आर्द्रा, रेवती, या नांवाची,) वृक्षाच्या नांवाची (आमलकी इत्यादि नांवाची) नदी नांवाची (गंगा, यमुना, या नांवाची) अन्त्य (म्लेंच्छ) नांवाची, (बर्बरी, शबरी, इत्यादि नांवाची,) पर्वताच्या नांवाची, पक्ष्यांच्या नांवाची, (शुकी, सारिका, इत्यादिनांवाची) सर्पाच्या नांवाची, (व्याली, भुजंगी इत्यादि नांवाची) प्रेष्य नांवाची, (दासी, चेटी, इत्यादि नांवाची) भयानक नांवाची (डाकिनी, राक्षसी, इत्यादि नांवाची) अशी कन्या वरूं नये. ज्या कन्येला भ्राता नाहीं, अथवा जिच्या पित्याचें नांव माहीत नाहीं, तिच्याशीं ज्ञात्या पुरुषानें विवाह करूं नये. कारण कीं भ्राता नस-

त्यास त्या कन्येविषयीं पुत्रिकाशंका (त्या कन्येस जो पुत्र होईल तो आपली और्ध्वदेहिक क्रिया करणारा होईल, या अभिप्रायानें पित्यानें दिलेली अशी शंका) उत्पन्न होते. आणि जिचा पिता अज्ञात असेल, तीविषयीं अधर्मशंका (जारजत्वशंका) उत्पन्न होते.

१० यावरून पाहातां विवाहाशिवाय कांहीं तरी मुली राहिल्या पाहिजेत, पण तसा प्रकार आढळत नाहीं. समाजांत अविवाहित पुरुष कोठें क्वचित् आढळतील, पण अविवाहित स्त्री बहुधा आढळणार नाहीं. मुलीचें लग्न झालेंच पाहिजे, अशी ठाम समजूत झाल्यामुळें, व्यंग मुलींचेही विवाह होतात. यामुळें विवाहाचा खरा हेतु पुष्कळ वेळ बाजूस राहातो. कोठें कोठें पिंपळाशीं किंवा एखाद्या देवाशीं विवाह लावण्याचाही प्रकार दृष्टीस पडतो. वेश्यांत सुद्धां मुलींस धंद्यांत घालण्यापूर्वीं, विवाह किंवा विवाहासारखा कांहीं प्रकार करण्याची चाल दृष्टीस पडते.

११ विवाह आईबापांनीं करावा किंवा ज्याचा त्यानें करावा, या प्रश्नाचा विचार करावयाचा म्हणजे कोणत्या विवाहापासून हितकारक परिणाम घडतील हें पाहिलें पाहिजे. ज्या प्रकारच्या विवाहापासून हितकारक परिणाम घडतील, तो विवाहाचा प्रकार चांगला, हें कोणीही कबूल करील. आईबापांनीं मुलांचा विवाह करावयाचा, असें मनांत आणल्यास त्यांनीं परिस्थितीचा सर्व बाजूंनीं विचार करावा. कोणत्याही एकाच गोष्टीला नसतें महत्व देऊं नये. जरूर वाटेल तर, आपल्या अपत्यांचें योग्य तेवढें मत त्या बाबतींत घ्यावें. म्हणजे त्यांना पश्चात्ताप करण्याची वेळ येणार नाहीं. त्याप्रमाणेंच मुलांच्या मनांत आपला आपण विवाह करावा, असें असल्यास त्यांनींही परिस्थितीचा विचार करावा, वडिलांची अनुमति घ्यावी व सारासार विचार करावा, म्हणजे त्यांसही पुढें पस्ताव्यांत पडण्याची पाळी येणार नाहीं.

१२ आईबाप केवळ आपला अधिकार म्हणून मुलांचे विवाह करूं लागतील, तर त्यापासून त्यांचें किंवा त्यांच्या संततीचेंही हित होणार नाहीं. **'कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता कुलं'**

मुलीला नवऱ्याचें रूप चांगलें असावें असें वाटतें. आईला मुलीच्या नवऱ्याजवळ (जांवयाजवळ) पैसा पुष्कळ असावा असें वाटतें, व बापाला जांवयाचें कूळ चांगलें असावें असें वाटतें. या श्लोकांत साधारणपणें विवाहांत कोणाचें लक्ष कोणत्या गोष्टींकडे असतें हें सांगितलें आहे. हा सिद्धांत नाहीं, पण यांत बरेंच तथ्य आहे.

१३ पाहिल्याबरोबर जर एकमेकांस एकमेकांबद्दल तिटकारा उत्पन्न होऊं लागला, तर पुढील प्रेमवृद्धीस स्थळाचाच अभाव उत्पन्न होईल! याकरितां वधूवरांच्या सामान्य आवडींचा प्रथम विचार करावा. विशेष प्रकारच्या मनुष्यांचें सर्वच विलक्षण असतें, तें सामान्य मनुष्यांस लावून उपयोगीं नाहीं. **देस्दीमोना, अथेल्लो-**च्या शौर्यावर लुब्ध झाली होती, **दमयंती, नळा**च्या गुणांवर लुब्ध झाली होती, या गोष्टी खोट्या नाहींत, पण दंपत्यास **'अनुरूपत्व'** हा गुण साधारणपणें असला पाहिजे, हें आईबापांनीं प्रथम लक्षांत ठेवावें. आपल्यास साधारणपणें सर्व गोष्टींचा विचार केला पाहिजे.

१४ प्रथम रूपाकडे पाहावें. तें उत्तम पाहिजे असें जरी नाहीं, तरी उभयतांस एकमेकांविषयीं प्रथमदर्शनींच अप्रीति उत्पन्न होणार नाहीं, याविषयीं जपावें. वधूवरें लग्नापूर्वी एकमेकांच्या दृष्टीस पडण्याचा योग आणणें, कांहीं वाईट नाहीं, तो अवश्य आणावा. विवाहासारख्या महत्वाच्या बाबीची ठरवाठरवी करतांना घाई करूं नये. विवाह करतांना, विवाहित जोडप्याला सुख व्हावें, हा आई-बापांचा प्रधान हेतु असावा. त्यांची आवडनावड कळण्याकरितां प्रयत्न करावे, केवळ आईबापांजवळ पुष्कळ वित्त आहे, किंवा लग्नांत हुंडा पुष्कळ येत आहे, कुळशील चांगलें आहे, विहिणींचा मानपान यथास्थित होईल, असल्या एखाद्या गोष्टीवरच विशेष भर ठेवूं नये. ह्या गोष्टींचा विचार करूं नये, असें नाहीं, पण तो कर-तांना वधुवरांच्या साधारण आवडींचा विचार प्रथम मनांत घेऊन, नंतर बाकीच्या गोष्टींचा विचार करावा. सर्वच गोष्टी साधतील, असें केव्हांही होणार नाहीं; पण वधूवरांच्या आवडीनिवडींस

संभाळून इतर गोष्टी साधतील तेवढ्या साधाव्या. त्यांचें मत घेण्यासारखें वाटेल तेवढें घ्यावें. मतभेद होतोसा वाटल्यास, आपलें मत कां ग्रहण करण्यासारखें आहे याबद्दल त्यांची खात्री करावी, व त्यांची अनुकूळता मिळवावी. सुंदर मुलास कुरूप मुलगी–पुष्कळ हुंडा मिळत आहे म्हणून–किंवा–सुंदर मुलास कुरूप मुलगी, कुळशीळ चांगलें आहे म्हणून–करितांना पुष्कळ विचार करावा. म्हाताऱ्या नवऱ्यास लहान मुलगी देणें, हा प्रकार निंद्य समजावा. मुलीचा विवाह बापानें कारावा, असें असलें तरी मुलीच्या सुखाकडे मुळींच लक्ष न देतां, कसाबसा नवरा पाहून तिच्या जन्माचें मातेरें करणें, किंवा केवळ स्वतांस पुष्कळ रुपये मिळत आहेत, म्हणून आंधळें बनून आपल्या कन्येच्या सुखाकडे दुर्लक्ष करणें, चांगलें नाहीं. बापाला मुलीच्या लग्नाकरितां द्रव्य खर्चण्याचें सामर्थ्य नसेल, तर त्यानें आपली मुलगी मोठ्या ठिकाणीं देण्याच्या भरीस पडूं नये; तिच्या लग्नाकरितां कर्ज काढूं नये, आपलें घरदार तिच्या भरीस घालूं नये; पण मुलीच्या नवऱ्याचें वित्त त्याच्या मागें आपल्यास मिळेल किंवा आजच तिच्यापासून आपल्यास मोठा लाभ होईल, किंवा आपल्या कुटुंबाचें आजन्म कल्याण होईल, असल्या लोभास गुंतून, म्हाताऱ्या किंवा जराग्रस्त किंवा अशक्त वराशीं तिचें लग्न सहसा करून देऊं नये. असें करून भवितव्यतेवर रिकामा दोष लादण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

१५ कन्याविक्रय करणें शास्त्रसंमत नाहीं. पुढील श्लोक पाहाः—

**न कन्यायाः पिता विद्वान् गृण्हीयात् शुल्कमण्वपि ।**
**गृण्हञ्छुल्कं हि लोभेन स्यान्नरोऽपत्यविक्रयी ॥**

**मनु**—अ. ३ श्लोक. ५१

"विद्वान् ( कन्याविक्रयाचा दोष जाणणाऱ्या ) पित्यानें ( वरापासून ) कन्येचें अल्पसुद्धां मौल्य घेऊं नये. कारण जर मनुष्य लोभानें कन्येचें मौल्य घेईल, तर तो आपल्या अपत्याचा ( कन्येचा ) विक्रय करणारा असा होतो."

१६ आपल्यास सामर्थ्य नसेल, तर वरास कांहीं देऊं नये. नवरा गरीब कां असेना, पण तो तरुण, सुशील, व उद्योगी असावा, हें चांगलें. दारिद्र्य हा कांहीं दोष नाहीं. दोघेंही उद्योगी असतील, तर तीं आपल्या प्रयत्नानें थोड्याच दिवसांत दारिद्र्यापासून मोकळीं होतील. म्हाताऱ्यास आपलें सामर्थ्य किंवा निघून गेलेलें तारुण्य, कोणत्याही उपायानें परत आणवणार नाहीं. जराग्रस्तास तरुण स्त्रीपासून–त्याच्या हातापायांस उपयोगीं पडण्याचा–जरी उपयोग घडला, तरी त्याच्यापासून त्याच्या स्त्रीस कांहीं उपयोग घडणार नाहीं. विवाह या लोकांत एक महत्वाचा व जन्मभर उपयोगीं पडणारा विधि आहे. तो करतांना फार विचार करावा. वधुवरांची संमति घेणें हेंच त्यांतलें प्रधान अंग समजावें. विवाहानें बद्ध झाल्यावर, उभयतांवर केवढी जबाबदारी पडते, हें आईबापांनीं आपल्या अपत्यांस चांगलें समजून सांगावें. विवाह योग्य विचारानें करून, ती जबाबदारी संभाळण्यास आपण त्यांस मदत करावी. अयोग्य विवाह करून, संततीच्या दुःखास आईबापांनीं कारण होऊं नये. त्यापेक्षां तें कर्तव्य त्यांनीं लांबणीवर टाकावें किंवा मुलांवर सोंपवावें. अज्ञानपणीं मुलांचे विवाह सहसा करूं नयेत. दोघें जणें साधारण वयांत आलीं, त्यांच्या आवडीनिवडी त्यांस कळूं लागल्या, विचार करण्याची त्यांस संवय झाली, म्हणजे त्यांच्या विवाहाचा विचार करावा, म्हणजे त्यांची संमति घेण्यास अडचण पडणार नाहीं.

१७ अविवाहित राहाण्याकडे हल्लीं कोणाचा फारसा कल नसतो, विवाहित व्हावें ही इच्छा प्रबल दिसते. याचें कारण अविवाहित पुरुषांचीं उदाहरणें दृष्टीपुढें नाहींत, हें आहे. **रामदासांच्या** वेळीं **रामदास** स्वतां **'सावधान'** म्हणतांच निघून गेल्यामुळें—पुष्कळ पुरुष विवाहाशिवाय राहात, व त्यांचे अनुयायी बनत. **महाराष्ट्रांत** साधुसंतांचे अवतार झाले, त्या काळांत-त्यांचें अवतारकृत्य डोळ्यांसमोर असल्यामुळें–पुष्कळ लोकांची प्रवृत्ति अविवाहित राहाण्याकडे असे, व कांहीं लोकांस विवाहित होण्याबद्दल आग्रह

करावा लागे. पुष्कळ कुटुंबांत वडील भावानें लग्न करावें व बाकीच्यांनीं अविवाहित राहावें अशी चाल होती.

१८ हल्लीं असलीं उदाहरणें डोळ्यांपुढें नसल्यामुळें, अविवाहित राहाण्याकडे फारसा कोणाचा कल दिसत नाहीं, पण हें बरोबर नाहीं. हल्लींही अविवाहित स्थितीची आपल्यास बरीच जरूरी आहे. **इंग्लंड** वगैरे सुधारलेल्या देशांत अनेक कला नव्यानव्या निघत आहेत, शास्त्रीय ज्ञानांत अनेक प्रकारचे शोध लागत आहेत, त्यांचें ज्ञान मिळविण्याची जरूरी आपल्यास भासत आहे, त्याकरितां परदेशगमन करण्याची आपल्यास फार जरूरी आहे, याकरितां अविवाहित राहणें,–निदान बराच वेळ अविवाहित राहणें,–आपणांस अगत्याचें झालें आहे. परोपकारांचीं अनेक कामें करणें, देशहिताचीं अनेक कामें करणें, यांसही अविवाहितपणा फार उपयोगीं पडतो. पाठीशीं पोरांबाळांचें लचांड असलें, म्हणजे धाडसाचीं कामें आंगावर घेणें कठीण पडतें. मोठमोठीं कामें, नवेनवे शोध, परदेशांतील प्रवास, मोठे मोठे व्यापार, थोडेंतरी धाडस केल्याशिवाय कसे सिद्धीस जाणार? याकरितां अशा गोष्टी कराव्या असें ज्यांस वाटत असेल, त्यांनीं सवामणाची बिडी आपल्या पायांत अडकवण्यापूर्वीं, पुष्कळ विचार अवश्य करावा.

१९ मुलें कर्तबगार निघतील असें वाटल्यास, त्यांच्या विवाहाचा काल लांबणीवर टाकणेंच चांगलें. त्यांचा विवाह त्यांच्या इच्छेविरुद्ध करूं नये. पण त्यांचा विवाह करणें श्रेयस्कर आहे, असें वाटल्यास–त्यांच्या अनुमतीनें–तो करून द्यावा, कारण मुलांस–कित्येक वाईट संवयींपासून–विवाहाच्या योगानें बचावतां येतें.

२० मुलीचें मात्र लग्न झालें पाहिजे, व मुलांस अविवाहित ठेवावयाचें, असें म्हणून चालणार नाहीं. मुलांस अविवाहित ठेवावयाचें मनांत आणल्यास, कांहींतरी मुली अविवाहित राहिल्यावांचून गत्यंतर नाहीं. मुलगे लग्नास मोठे करावयाचे, असें मनांत आणल्यास मुलीही मोठ्या होणारच. कांहीं पुरुषांनीं अविवाहित राहावें असें मनांत आणल्यास, कांहीं स्त्रिया अविवाहित राहाण्यास हरकत

नाहीं, असें म्हणण्याची पाळी येणारच! तेव्हां या गोष्टीस समाजाची हरकत येतां उपयोगीं नाहीं, याचा विचार आईबापांनीं अवश्य करावा. विवाह करावयाचा, म्हणून प्रत्येक व्यक्ति विवाहित झाली पाहिजे, असा हट्ट धरणें चांगलें नाहीं. विवाह करणारांस, आपला उभयतांचा व मुलांबाळांचा निर्वाह पुढें चालवितां येईल, अशी खात्री असली पाहिजे. लग्नाकरितां वर्गणी करावयाची, संततीच्या कार्याकरितां वर्गणी करायाची, असा प्रकार असल्यास तो स्तुत्य कसा म्हणतां येईल! आईबाप विवाह करोत किंवा ज्याचा तो विवाह करो, विवाह करण्यापूर्वी बराच विचार करावा.

२१ आईबापांनीं मुलांचीं लग्नें केल्यास व सून त्यांच्या हाताखालीं वागल्यास, सुनेस नम्रतेचें, कुलपरंपरागत वर्तनाचें, वळण लागेल; ज्याचा त्यानें विवाह केल्यास, ह्या गोष्टींच्या फायद्यास मुकावें लागेल. हल्लीं अविवाहित माणसें जरी फारशीं आढळत नाहींत, तरी समाजांत तशीं माणसें कांहीं असलीं, म्हणून हरकत नाहीं. त्यांनीं आपलें वर्तन मात्र शुद्ध राखण्याची खबरदारी घ्यावी. सर्वांनीं लौकर लग्नें करावीं, असें नाहीं. विवाहकाळ साधेल त्या मानानें लांबविणें चांगलें. मात्र भलत्याच वेळीं म्हणजे बरेंच वय होऊन गेल्यावर, लग्न करणें चांगलें नाहीं. लग्न अल्प वयांत झालें असलें, व मुलीस ऋतुप्राप्ति लौकर झाली असें आपल्यास वाटलें, तर संभोगकाल थोडाबहुत लांबविण्यास हरकत नाहीं. संतति होण्यापूर्वी, शरीरसंपत्तीची योग्य वाढ होईल तेवढी चांगली.

२२ मुलींचा विवाह झालाच पाहिजे, या समजुतीमुळें आईबाप लुल्याखुळ्या मुलींचेही विवाह करितात! ही तर फारच वाईट गोष्ट आहे. यामुळें व्यंग संततीची समाजांत भर पडते. विवाहास नवरा तयार नसल्यास, कोणास लग्न करण्यास—दुसरी बायको करण्यास–पैसे देण्याचें कबूल करून, नवऱ्यास लग्नापुरता उभा करतात! मुलीचें लग्न झाल्यावर, तिच्या संरक्षणाचा बोजा

बापावरच असतो. अशा संततीचे विवाह झाले नाहींत म्हणून काय झालें! या गोष्टीचा विचार आईबापांनीं अवश्य करावा. लग्न जमविण्यांत एक प्रकारचें पुण्य आहे, अशी समजूत असल्यामुळें–किंवा मध्यस्थांच्या द्रव्यलोभामुळें–इकडे बोलावयास नको व तिकडे चालावयास नको, अशा प्रकारचे विवाह कित्येक वेळां होतात, पण तें बरें नाहीं.

२३ पुरुषांस—एकवार विवाहित झालेल्या पुरुषांस–तर या लग्नाचें म्हणजे दुसरा विवाह करण्याचें किंवा दुसरी बायको वारल्यास तिसरा विवाह करण्याचें, वेड लागल्यासारखें दिसतें; पण तें चांगलें नाहीं, त्यांनींही दोन्ही बाजूंचा नीट विचार करून मग काय करणें तें करावें.

२४ विचारी मनुष्यानें तरी लहानपणीं किंवा प्रौढ होण्यापूर्वी, आपल्या पायांत सवामणाची बिडी अडकवून घेणें चांगलें नाहीं. आईबापांनीं आपल्या मुलांवर या बाबतींत सक्ती करूं नये. कारण विवाह झाल्यावर, मुलांच्या प्रगतीस अडथळा येतो. ज्यांच्या आशा मोठ्या आहेत, किंवा महत्वाकांक्षा प्रबळ आहेत, अशा माणसांस सुटें राहिल्यास, आपल्या उन्नतीचे अनेक प्रयत्न करितां येतात; लांबलांबचे मुलुख पाहून आपल्या ज्ञानांत व अनुभवांत भर घालतां येते; परंतु ते विवाहपाशानें बद्ध झाल्यास, त्यांच्यानें तसें कांहीं कार्य होणें मोठ्या मुष्किलीचें होतें.

२५ समाजांत माणसांचा तोटा असला, व संपत्तीचा पुरवठा असला, म्हणजे प्रत्येकानें विवाह केला तरी चालण्यासारखें असतें. पण याच्या उलट स्थिति असल्यावर, विवाह करणाराची पुष्कळ वेळां फजीती होते. विवाह झाला म्हणजे प्रथम जेथें एका पोटाची काळजी असते, तेथें दोन पोटांची काळजी उत्पन्न होते, व पुढें स्वाभाविकपणें सुरू होणारा संततीचा खटाटोप सुरू झाल्यावर, ती याहीपेक्षां वाढते. अशा वेळीं उभयतां मातापितरें श्रम करणारीं असून, निर्वाहास लागणाऱ्या साधनांचा पुरवठा करणारीं असल्यास

मात्र सर्व गोष्टी नीट चालतात, नाहींतर जगांत फटफजीती उडण्याची वेळ येते. आपल्यास खाण्यापिण्यास नीट मिळत नाहीं, संततीची जोगवण नीट करितां येत नाहीं, लोकांपुढें तोंड वेंगाडण्याची व हात पसरण्याची वेळ येते, यासारखी लज्जास्पद व हृदयविदारण करणारी दुसरी गोष्ट कोणती ? याकरितां लग्न करण्यापूर्वी या सर्व गोष्टींचा अवश्य विचार करावा.

२६ जगांत प्रथमतः आपला स्वतांचा टिकाव कसा लागेल, हें पाहिलें पाहिजे. आपण आपला निर्वाह करूं, इतकी हिंमत असल्याशिवाय लग्न करणें चांगलें नाहीं. पण इतकी हिंमत आल्यावरही थोडाबहुत अवकाश धरणें चांगलें. साळ्याची गाय, माळ्याचें वांसरूं, अशा पद्धतीनें सर्व तयारी करून, लग्न करून घेणारांस लग्नापासून मिळणारें खरें सुख प्राप्त होत नाहीं. आपली प्राप्ति संसार थाटावयास साधारणपणें पुरेल, अशी असली पाहिजे. कर्ज काढून लग्न करणें चांगलें नाहीं. लग्नापूर्वी–पुढें लग्न करावयाचें आहे हें ठाऊक असून–जर लग्नापुरते पैसे आपणांस शिल्लक ठेवितां आले नाहींत, तर लग्न झाल्यावर, मग तो पैसा आपण फेडूं, हें अनुमान कशाच्या जोरावर करावयाचें ! अशा प्रकारच्या लग्नानें आपणांस सुख व्हावयाचें एकीकडे राहून, एकाच्या ठिकाणीं दोन माणसें दुःख भोगण्यास तयार होतात, इतकेंच काय तें !

२७ विवाह करितांना आपली प्राप्ति, निदान आपण, आपली बायको, व एक दोन मुलें, यांस पुरण्यासारखी असली पाहिजे; नाहींतर आपली प्राप्ति उत्तरोत्तर वाढणारी तरी असली पाहिजे. मनुष्यास सर्व आयुष्यभर सारखा पैसा मिळत नाहीं. त्यास तरुणपणांत श्रम करवतील तसे म्हातारपणांत करवणार नाहींत, यामुळें त्यास पुढें पुढें कमी पैसा मिळण्याचा संभव असतो. संसार वाढता असतो. त्यास एकसारखी अधिक पैशाची जरूरी लागत असते. याकरितां आपण प्रथमपासून जपून वागण्यास शिकलें पाहिजे.

२८ लग्न करतांना स्त्रीच्या नुसत्या स्वरूपाकडे लक्ष देण्यापेक्षां, ती शरीरानें सशक्त आहे किंवा नाहीं, तिला संसाराचीं कामें

करितां येतील किंवा नाहीं, इकडे अधिक लक्ष द्यावें. संसारांत अनेक यातायाती सोसाव्या लागतात. त्या सोसण्यास उभयतांस सामर्थ्य असलें पाहिजे. केवळ मोठ्या कुळावर किंवा हुंड्यावर लक्ष देणें चांगलें नाहीं. कुळाचा विचार केला तरी सशक्तपणा पाहिलाच पाहिजे. रोज कराव्या लागणाऱ्या परिश्रमांचें माप, कुळानें किंवा एक वेळ मिळणाऱ्या हुंड्यानें, भरून यावयाचें नाहीं, प्रत्येक कामाला चाकरमाणसें ठेवण्याची ऐपत असल्यास गोष्ट निराळी.

२९ अविवाहित राहावें असें मनांत आल्यास, त्या स्थितींतील अडचणींचा चांगला विचार करावा. आपल्यांत अविवाहित माणसें हल्लीं फारशीं आढळत नाहींत. आढळतात, तीं आचरणशुद्ध नसतात, याकरितां अविवाहित राहाणें धोक्याचें आहे असें ह्मणावें लागतें. आचरणशुद्ध माणसें अविवाहित राहिल्यास, त्यांचा समाजास व देशास चांगला उपयोग होईल, यांत शंका नाहीं. पण अनीतिमान माणसें समाजाच्या जवळ राहाणें भयंकर असतें. याकरितां आपण अविवाहित राहूं व आपलें आयुष्य सत्कार्यांत खर्चूं, असा भरंवसा असल्याशिवाय अविवाहित राहाण्याचा निश्चय न करणें चांगलें. कांहीं वेळ अविवाहितपणाचा अनुभव घेण्यास हरकत नाहीं, पण विवाह करावयाचा असेल तर तो योग्य वेळीं करावा. लहानपणीं लग्न करणें जसें अप्रशस्त, तसेंच तें तारुण्य गेल्यावर करणेंही अप्रशस्तच. योग्य वेळ उलटून गेल्यावर विवाह करणें चांगलें नाहीं, अशानें '**इदं च नास्ति परं च न लभ्यते**'; असें होण्याचा पुष्कळ संभव असतो. योग्य वेळ चुकल्यामुळें पुष्कळांच्या संसाराची फजीती झाली आहे. तारुण्य फुकट घालवून वृद्धापकाळीं विषयसुखाकरितां वेडावणें, यासारखी दुःखकारक गोष्ट दुसरी नाहीं. याकरितां या गोष्टीचा विचार योग्य वेळीं करावा.

३० प्राचीनकाळीं आठव्या वर्षीं उपनयन, बारा वर्षें विद्याभ्यास, व वीस वर्षांपुढें विवाह, असा साधारण नियम असावा, असें **मनुस्मृती**-वरून वाटतें. हल्लींही एकादी विद्या किंवा कला शिकण्यास साधारण-

पणें बारा वर्षें लागतात. याकरितां विवाहाचा काल साधारणपणें वीस वर्षांपासून धरण्यास हरकत नाहीं. **'विशी विद्या व तिशी धन'** ही म्हणही साधारणपणें त्याच कालाचा बोध करिते, बरेच विवाह या सुमारास होतात. तीस वर्षांपर्यंतही विवाह झाल्यास फारसें वाईट नाहीं. परंतु पसतीस किंवा चाळीस या वयापर्यंत विवाहाचा काल लांबवीत नेणें, फारसें हितकर होणार नाहीं.

३१ विवाह करावयाचा तो आपल्यास संसार चालवण्यास एक चांगला जोडीदार असावा, म्हणून करावयाचा; तो जोडीदार जितका समंजस, सशक्त, सद्गुणी, सहनशील, व समवयस्क असेल तितका चांगला; मुलें खेळूं लागल्यास त्यांचें त्यांच्या समवयस्कांशीं जसें जमतें, तसें त्यांच्यापेक्षां लहान किंवा मोठ्या मुलांशीं जमत नाहीं. वधूवरांचेंही असेंच आहे. प्रथम विवाहांत वधूवरांचें जसें जमतें, तसें द्वितीय विवाहांत जमत नाहीं. याचें कारण त्यांच्या वयांतील असमता. द्वितीय विवाहांत वर पोक्त असतो, तशी वधू पोक्त मिळण्याचा संभव नसतो. वयोमानांत फरक असल्यामुळें त्यांच्या स्वभावांत, समजुतींत, वागणुकींत, आवडीनिवडींतही फरक असतो, यामुळें एकमेकांचें एकमेकांशीं जमणें कठीण पडतें. वधू लहान, तिचें मन निष्कपट व सरळ, पण पति वृद्ध, अनुभविक व संशयी, मग अशा वधूवरांचें पटावें कसें ? प्रथम विवाहांत सुद्धां, उभयतांच्या वयांत बरेंच अंतर असल्यास, ही अडचण जाणवल्याशिवाय राहाणार नाहीं.

३२ मुलगी कितीही वाढली, तरी हल्लींच्या स्थितींत ती बारा तेरा वर्षांची होणार, तेव्हां तिचा विवाह वीसपंचवीस वर्षांच्या पुरुषाशीं झाल्यास, तो जितका योग्य व उभयतांत मेळ ठेवणारा होईल, तेवढा पुरुषाचें वय बरेंच वाढलेलें असल्यास त्याच्याशीं मेळ ठेवणारा होणार नाहीं. एक गुजराथी तीस वर्षांचा होता, व त्याची बायको आठ वर्षांची होती. घरांत दोघांखेरीज तिसरें मनुष्य नव्हतें. नवरा तिचें मन राखण्याकरितां हवी तेवढी

मेहेनत करी, पण ती मुलगी अगदीं लहान असल्यामुळें, उगीच हट्ट करीत बसे; रडावयास लागे, व तिची समजूत बहुधा होत नसे. त्या गुजराथ्यास लग्न केल्याबद्दल वारंवार पश्चात्ताप होई, व केव्हां केव्हां तर तो बायकोचा हट्ट पाहून फार कंटाळून जाई! तेव्हां वयांत साम्य असण्याची किती आवश्यकता आहे, हें यावरून कळून येईल.

३३ परस्परप्रेमामुळें झालेल्या विवाहापासून पुष्कळ फायदे होतात, हें निर्विवाद आहे. निदान त्या स्थितींत दुसऱ्यावर दोष ठेवण्यास तरी जागा नसते, पण त्या स्थितींतही तोटे नाहींतच असें नाहीं. दोघांचें प्रेम एकदम गांठ पडून जमल्यास, पुष्कळ वेळां तें बेगडेच्या रंगासारखें प्रथम मात्र झगझगीत दिसतें. पण हळू हळू कमी होऊन शेवटीं अजीबात नाहींसें होतें. शिवाय परस्पर प्रेम कसोटीस लागण्यास, आपली हल्लींची सामाजिक स्थिति फारशी अनुकूळ नाहीं. प्रौढ मुलगे व मुली, यांची गांठ लग्नाच्या आधीं विशेष मोकळेपणीं पडण्याचे प्रसंग, आपल्यांत फारसे येण्याचा संभव नसतो. फार तर मुलगे व मुली एकमेकांजवळ बोलूं शकतील, दृष्टीस पडूं शकतील, खेळूं शकतील, पण त्यांस बराच वेळ एकत्र राहाण्याचे किंवा एकमेकांचीं मनोगतें एकमेकांस कळविण्याचे, किंवा एकमेकांचे स्वभाव तपासून पाहाण्याचे, प्रसंग फारसे येण्याचा संभव नसतो.

३४ आपल्या हल्लींच्या पद्धतींत, पुष्कळांचा भर टिपणें पाहाण्यावर असतो. तो दूर ठेवला, तरी कुळशीळ व गोत्र पाहिल्याशिवाय चालावयाचेंच नाहीं. ज्यांच्या गोत्राशीं जमत नाहीं, त्यांच्या इतर गोष्टींत कितीही साम्य असलें तरी, त्याचा कांहींएक उपयोग नाहीं. याकरितां नुसतें प्रेम विवाहास कारणीभूत होणें, आपल्यांत फारसें शक्य नाहीं. ह्मणून केवळ वधूवरांची आवड, ही आमच्यांत लग्नाची मुख्य बाब होऊं शकत नाहीं. तरीपण वडील माणसांनीं तिच्याकडे दुर्लक्ष करूं नये, केवळ आपलाच हेका चालवूं नये, संततीचा अभिप्राय घेत जावा. विवाहापूर्वी वधूव-

रांची गांठ पडण्याचा व एकमेकांचे स्वभाव पाहाण्याचा, प्रसंग त्यांस आणून देतां येईल, तर कांहीं वाईट नाहीं. सर्व गोष्टींवर साधारण लक्ष ठेवून झालेले आमच्यांतील विवाह, केवळ असुखासच कारण होतात, असें आढळत नाहीं. त्यांतले पुष्कळ विवाह उभयतांच्या सुखास कारण झालेले आढळतात. पुष्कळ जोडप्यांत एकमेकांवर प्रेम करणारीं—निरतिशय प्रेम करणारीं—नवराबायको दृष्टीस पडतात. तेव्हां विवाह आईबाप करोत,—किंवा मुलें वयांत आल्यावर तीं आपले आपण करोत,—सारासार विचार करून ते झाले, म्हणजे वधूवरांच्या सुखास कारण झाल्याशिवाय राहाणार नाहींत.

३५ लहान वयांत लग्नें झाल्यास, संतति दुबळी होण्याचा संभव असतो. उतार वयांत संतति झाल्यास, तीही कमजोर होण्याचा संभव असतो. उभयतांची शरीरप्रकृति निरोगी व पूर्णावस्थेंत असतांना होणारी संतति, सुदृढ व निकोप होण्याचा संभव पुष्कळ. याकरितां मुलांच्या विवाहाचा काल वीस वर्षांपासून तीस वर्षेंपर्यंत प्रशस्त ठरतो.

३६ मुलींचा विवाहकाल—ऋतुप्राप्तीची अडचण मानली जात आहे तोंपर्यंत—बारा वर्षांच्या फारसा पुढें नेणें शक्य नाहीं. मुलींस लौकर ऋतुप्राप्त होईल, तर संभोगकाल थोडाबहुत दूर लोटणें शक्य आहे. ऋतु प्राप्त होतांच, सोळा दिवसांच्या आंत गर्भाधान करण्याची घाई, अलीकडे फार दृष्टीस पडते, ती करण्याचें विशेष कारण दिसत नाहीं. पुढें गर्भाधान करण्याचें मनांत आणल्यास दिवस पाहावा लागतो, ही कांहीं मोठी अडचण आहे, असें नाहीं. स्त्रीची वाढ पुरी होण्यास सोळापासून अठरापर्यंत वर्षें लागतात. व तिला संतति वीसपंचवीस वर्षांच्या दरम्यान सशक्त होते, असें वैद्यशास्त्र जाणणारांचें मत आहे. याकरितां उपभोगकाल थोडाबहुत लांबवीत गेल्यास, या गोष्टी सहज साधण्यासारख्या आहेत. आईबापांनीं आपल्याकडून होणारा शक्य तो उपाय केल्यास, समाजांतील दुबळेपणा बराच कमी होईल.

अल्प वयांत संतति गमावणें, अशक्त संतति होणें, पुष्कळ बायकांस लहानपणींच आईचें पद प्राप्त होणें, सामान्य वयांत त्या केवळ दुबळ्या बनणें, पुष्कळांस बाळंतरोग होणें, त्यांच्या पाठीशीं मुलांची माळच माळ लागणें, बाळंतपण सुखाचें न होतां वेडेवांकडे प्रसंग येणें, इत्यादि पुष्कळ हानिकारक गोष्टी, या एका गोष्टीकडे लक्ष दिल्यास नाहींशा करितां येण्यासारख्या आहेत.

३७ वास्तविक म्हटलें म्हणजे, व्यंग, अशक्त, रोगी, अशी संतति झाल्यास तिचा विवाह न करणें चांगलें. पण ही गोष्ट मुलांमुलींस सारखीच लागू आहे. मुलींचे विवाह झालेच पाहिजेत, असें म्हटलें, कीं त्यांस कोणाच्या तरी गळ्यांत बांधलेंच पाहिजे, असें झालें; या चालीचे परिणाम फार वाईट होतात. समाजांत दुबळ्या संततीची भर पडते. बापास विनाकारण त्रासांत पडावें लागतें. त्यास रिकामी काळजी वाहावी लागते, व विनाकारण खर्चांत पडावें लागतें. तो त्रास त्याच्या कुटुंबासही जाचक होतो. हें समाजास व राष्ट्रास सारखेंच घातक आहे. याकरितां हे विवाह टाळावयाचे असल्यास, अशा मुलींस लग्नाशिवाय समाजांत राहतां आलें पाहिजे; म्हणजे मुलांप्रमाणें कांहीं मुली समाजांत अविवाहित राहिल्या, तरी तो दोष असें समाजानें मानितां उपयोगीं नाहीं. परंतु असें ठरलें नाहीं, तोंपर्यंत आईबापांस त्यांचे विवाह करणें भाग आहे. अशा मुलींशीं विवाह करण्यास कोणी तयार नसतो. बापास कोणास तरी द्रव्याची लालूच दाखवून, लग्न लावण्यापुरता उभा करण्याची वेळ येते. अशा मुलींचा व कदाचित् त्यांस संतति झाल्यास त्या संततीचा, भार आईबापांस सोसावा लागतो. मुलीचा विवाह केल्याशिवाय गत्यंतर नसल्यामुळें, बापास वृथा अडचणींत पडावें लागतें.

३८ व्यंग मुलांस विवाहाशिवाय राहतां येतें. त्यांस समाजाची अडचण नाहीं. पण बापाजवळ संपत्ति असली म्हणजे त्या संपत्तीच्या जोरावर, तो आपल्या मुलाचे दोन हातांचे चार हात करून घेतो. मुलगा लग्नाशिवाय राहाणें हेंच त्यास मोठें लांच्छन वाटतें.

अशा रीतीनें विवाह करणें फार वाईट. प्रथम आईबापांस तसें वाटत नाहीं. अनुभवान्तीं, आपल्या अविचारी कृत्यांचीं कडू फळें, त्यांस चाखण्याची वेळ आली म्हणजे त्यांचीं तोंडें गोरीमोरीं होतात, व त्यांस वाईटही वाटतें, पण मग त्याचा उपयोग नसतो!

३९ मुलगी असावी चित्रासारखी सुरेख, पण बापानें तिला एखाद्या श्रीमंताच्या कुरूप मुलाच्या गळयांत बांधावी; किंवा एखादी हुशार मुलगी, एखाद्या अक्षरशत्रूच्या गळयांत अडकवावी; जशी कांहीं संपत्ति सर्व उण्या गोष्टी पुऱ्या करूं शकते, पण एवढ्यां-तच हा प्रकार संपत नाहीं. आईबाप विचारशून्य बनून एखाद्या वेड्याविद्र्या, अजागळ किंवा बुळकट मुलाच्या गळयांतही, आपली सोन्यासारखी मुलगी केव्हां केव्हां बांधितात; मुलाचे आईबापही, 'मुलाचे दोन हातांचे चार हात करणें हें आपलें कर्तव्य आहे,' या नादानें, आपल्या अजागळ व संसारास निरुपयोगी मुलाचे, दोन हातांचे चार हात–असल्या सुरूप मुलींस नाडून,–त्या बिचाऱ्यांस न विचारतां,–त्यांच्या इच्छेविरुद्ध, आपल्या डोळ्यांस पडदे बांधून–मोठ्या–थाटामाटानें,–करून घेतात; व आमच्या बाळयास मुलगी पण मुलगी मिळाली, अशा फुशारक्या मारतात. सुना वयांत येऊं लागल्या व बाळयाचें लक्ष तिकडे जात नाहींसें दिसलें, म्हणजे आपल्या मनांत खजील होतात, पण असे प्रकार होतां होई तों न होऊं देणें चांगलें.

४० '**यः सुंदरस्तद्वनिता कुरूपा**' या सुभाषिताचा दाखला घेऊन आपल्यास पळण्यास मार्ग शोधीत बसणें चांगलें नाहीं. विवाहाचा हेतु विवाहित जोडप्यास सुख व्हावें, हा पहिला; त्यांनीं धर्माचरणानें वागावें, हा दुसरा; व त्यांच्यापासून समाजांत सुसंततीची भर पडावी, हा तिसरा. नवराबायको यांचें एकमेकांवर प्रेम नसलें, तर पुढल्या गोष्टी होण्याची आशाच खुंटेल. त्यांचें एकमेकांवर प्रेम बसण्यास, त्यांच्या स्वरूपांत कांहीं तरी साम्य पाहिजे. तें साधणें हें आईबापांचें कर्तव्य आहे. केवळ स्वरूपावर सर्व मदार ठेवावी असें कोणाचें म्हणणें नाहीं, पण साधारणपणें उभय-

तांच्या स्वरूपांत, गुणांत, शीलांत मेळ असेल तितका चांगला, यांत कांहीं शंका नाहीं. केवळ पैशावर नजर देण्याची प्रवृत्ति अधिक दिसते, ती कमी झाली पाहिजे. पैसा हें एक सुखाचें साधन आहे खरें, पण सर्वच गोष्टी पैशानें साध्य होत नाहींत, हें लक्षांत ठेवावें. स्त्रीपुरुषांचे जोडे विजोड बनवून, दैवावर हवाला ठेवण्याचा प्रकार अगदीं सोडून द्यावा. विवाह हा नवराबायकोच्या सुखाकरितां करावयाचा आहे, हें विशेषेंकरून लक्षांत ठेवावें. आपल्या कांहीं सोई व्हाव्या, किंवा आपल्या आवडी पुराव्या, म्हणून तो करावयाचा नाहीं. ह्या साऱ्या गौण गोष्टी होत. संततीस शिकवून तयार करण्याचें काम आपण करावें, विवाह करण्याचें आपलें कामच आहे, असें समजूं नये; योग्य प्रकारानें विवाह करतां आल्यास करावा, नाहींतर तें काम त्यांचें त्यांस करूं द्यावें.

४१ मुलींचे विवाह करण्याची जबाबदारी धर्मशास्त्राप्रमाणें आईबापांवर आहे. तरी ते करतांना त्यांनीं दुराग्रह धरूं नये. **सावित्री**च्या गोष्टीचें स्मरण ठेवावें. आजूबाजूच्या सर्व गोष्टींचा विचार करावा, लहानपणीं विवाह करूं नये. शक्य तितक्या त्यांस मोठ्या कराव्या, युक्तीनें त्यांचें मत काढून घ्यावें, अशक्त किंवा कुरूप वरांना देऊं नयेत. व्यंग मुलाचे तर भरीस पडूंच नये. गरीबी पुरवेल पण न्यूनता पुरवत नाहीं. म्हाताऱ्या नवऱ्यास देऊं नये. मुलीचे पैसे घेऊं नयेत. सामर्थ्यापेक्षां अधिक पैसा खर्च करून कुटुंबाची नागवणूक करूं नये. योग्य वर आपल्या स्थितीप्रमाणें पाहाण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे त्यांच्या मुली त्यांस दुवा देतील, त्यांचे जन्म सुखांत जातील, व आईबापांसही त्यांनीं आपलें कर्तव्य योग्यरीतीनें बजावल्यामुळें आनंद होईल.

---

# उपसंहार.



१ आईबापांनीं आपल्या मुलांकरितां काय केलें पाहिजे, हें सांगण्याचा या लेखाचा मुख्य उद्देश होता. आईबापांचें आपल्या मुलांवर प्रेम असतें, याबद्दल कोणाचाच वाद नाहीं; पण कोणत्याही वस्तूचा चांगला उपयोग केला नाहीं, तर ती वस्तु चांगली असूनही तिचा उपयोग व्हावा तेवढा होत नाहीं. याकरितां त्या प्रेमाचा पद्धतशीर उपयोग करतां आल्यास चांगलें.

२ आईबापांची मुलांबद्दल साधारणतः थोडथोडी कुरकुर नेहमीं असते. पण त्यांत विशेष अर्थ असतोच असें नाहीं. आईबापांनीं योग्य वर्तन ठेवल्यास, त्यांतील बरीच कुरकुर नाहींशी होण्यासारखी असते. तें वर्तन कसें ठेवावें, हें सांगण्याचा या पुस्तकांत प्रयत्न केला आहे.

३ पहिल्या भागांत, संतति चांगली होण्याकरितां आपण ह्मणजे आईबापांनीं काय केलें पाहिजे, हें सांगितलें आहे. त्यांत आईबापांनीं आपली प्रकृति सुदृढ राखण्याचा प्रयत्न करावा, निर्व्यसनी असावें, आपलें मन शांत ठेवावें, सद्वृत्तनी व्हावें, आपलीं सर्व कर्तव्यें नीट ओळखून, तीं अमलांत आणण्याकरितां कायावाचामनें-करून झटावें, ह्मणजे आपलें वर्तन कित्त्यासारखें संततीस उपयोगीं पडेल, व संतति सहज चांगली होईल, असें सांगितलें आहे.

४ दुसऱ्या भागांत, आईबापांची मुलांशीं वागणूक कशी असावी, याबद्दल विचार केला आहे. यांत आईबापांनीं आपलें प्रेम योग्य रीतीनें ठेवल्यास, मुलांची सुधारणा कशी होते, हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. यांत आईबापांनीं जें प्रेम करावयाचें, तें निष्काम असावें, त्याच्याबद्दल मोबदला मिळण्याची इच्छा त्यांनीं धरूं नये, आपलें कर्तव्य ह्मणून तें करावें, असें सांगितलें आहे.

५ तिसऱ्या भागांत, मुलांस योग्य तें शिक्षण आईबापांनीं द्यावें, त्यांत अंतर करूं नये, हें सांगितलें आहे. आपल्याकडे पूर्वी शिक्षण देण्याची पद्धति कशी होती, त्यांत कालमानाप्रमाणें फरक कसा पडत गेला, हल्लींची शिक्षणपद्धति कशी आहे, त्यांत कांहीं सुधारणा हव्यात, असें वाटल्यास आईबापांनीं काय करावें, हें सांगितलें आहे. शिक्षक शिक्षण देत असतात, तरी आईबापांवर शिक्षणाची जबाबदारी किती आहे, हें विस्तृत रीतीनें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

६ चवथ्या भागांत, मुलांचे विवाह करतांना, कोणत्या गोष्टींकडे लक्ष देणें जरूर आहे,याचा विचार केला आहे. तो करतांना, आपल्या सामाजिक चाली कशा आहेत, त्यांत कोणते दोष आहेत, ते कसे दूर करावे, मुलांचा विवाह करण्यांत आईबापांचा कोणता हेतु असावा, इत्यादि विषयांचा विचार केला आहे.

७ एकंदरींत,या निबंधांत संततीच्या हिताकरितां आईबापांनीं काय करावें, हें स्पष्टपणें सांगण्याचा प्रयत्न केला आहे. अधिकाराच्या संबंधानें पाहिल्यास, माझा अधिकार फार थोडा आहे. पण आपल्या समाजाची स्थिति सुधारावी, या कळकळीनें प्रोत्साहित होऊन, जे जे विचार सुचले, ते ते या निबंधांत एका ठिकाणीं ग्रथित करण्याचा प्रयत्न केला आहे. तो कसा साधला आहे, हें पाहाणें हे काम सज्जनांचें आहे.

८ **डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी** च्या सभासदांनीं, हा लेख काळजी पूर्वक वाचून जे दोष दाखविले, ते नाहींसे करण्याचा प्रयत्न, माझ्याकडून झाला तेवढा केला आहे.

९ या निबंधांत जें सार वाटेल तें ग्रहण करावें, असार टाकून द्यावें, कमजास्त मला अवश्य कळवावें व ही अल्प सेवा मानून घ्यावी, अशी माझी वाचकांस प्रार्थना आहे.



## लोंढे यांनीं केलेलीं उपदेशपर पुस्तकें.

### पुस्तकें त्यांच्या किंमती व अभिप्राय.

१ **बोधशतकः**—( आवृत्ति पांचवी ) किंमत दीड आणा. श्लोकबद्ध. अभिप्रायः—"हें पुस्तक प्रत्येक लहान मुलानें वाचल्याशिवाय व त्यांतील बोधपर कविता पाठ केल्याशिवाय राहूं नये, अशी आमची त्यांना शिफारस आहे." **केसरी.**

२ **संगीतसुधाः**—( आवृत्ति चौथी. ) किंमत दीड आणा. साक्या, दिंड्या, पदें, वगैरे कविता. अभिप्रायः—"यांतील कविता सरळ, सोपी, व मनावर ठसा उमटण्याजोगी साधली आहे." **सुबोधपत्रिका.**

३ **उपदेशमालाः**—( आवृत्ति सातवी. ) किंमत दीड आणा. श्लोकबद्ध. अभिप्रायः—"**लोंढे** यांचा हा प्रयत्न त्यांच्या पूर्वीच्या प्रयत्नांप्रमाणेंच चांगला साधला आहे." **विविधज्ञानविस्तार.**

४ **ऐतिहासिक संगीतः**—( आवृत्ति दुसरी ) किंमत दीड आणा. साक्या, दिंड्या, पदें, वगैरे कविता. अभिप्रायः—"यांतील कविता सरळ सोपी व सहजरीतीनें केलेली आहे. इतिहासाचा नाद मुलांस लागण्यास हा चांगला मार्ग आहे." **ज्ञानचक्षु.**

५ **बोधामृतः**—श्लोकबद्ध. किंमत दीड आणा. अभिप्रायः—"पद्यें सुरस, आणि बोध फार चांगला आहे. मुलांनीं अवश्य वाचावें." **बालबोध.**

६ **बोधसुधाः**—(आवृत्ति दुसरी) किंमत दीड आणा. साक्या, दिंड्या पदें वगैरे कविता. अभिप्रायः—"मुलांस कवितेंत बोध केला आहे. चांगला व सोपा आहे." **पुणेंवैभव.**

७ **पुष्पगुच्छः**—( आवृत्ति दुसरी ) किंमत दीड आणा. श्लोकबद्ध. अभिप्रायः—"कविता चांगल्या आहेत. रा. **लोंढे** हे अर्वाचीन कवीं पैकीं एक आहेत." **मनोरंजन निबंधचंद्रिका.**

८ **पुष्पमालाः**—श्लोकबद्ध. किंमत दीड आणा. अभिप्रायः—"कविता साधी आणि हृदयंगम उतरली आहे. **लोंढे** यांनीं मुलां-

करितां चांगला उपक्रम चालविला आहे." **काव्यरत्नावली.**

९ **पुष्पावली**:—श्लोकबद्ध. किंमत दीड आणा. अभिप्रायः— "सोप्या व लहान कविता आहेत. एकंदरींत पुस्तक चांगल्यापैकीं आहे." **केसरी.**

१० **बोधमाला**:—श्लोकबद्ध. किंमत दीड आणा. अभिप्रायः—"रा. **लोंढे** यांस कविता रचण्याची हातोटी चांगली साधली आहे. कित्येक ठिकाणीं बोध चांगला साधला आहे."

**इस्त्राएली धर्मदीप.**

११ **दृष्टांतमाला**:—श्लोकबद्ध किंमत दोन आणे. अभिप्रायः— "प्रस्तुत लहान पुस्तकांत अनेक स्फुट विषयांवर कविता असून नांवाप्रमाणें प्रत्येक विषयावर ऐतिहासिक दृष्टांत कवितेंत गोविंले आहेत. प्रयत्न फार चांगला असून पुस्तक बोधपर व संग्राह्य आहे."

**सयाजीविजय.**

१२ **कुसुममाला**:—श्लोकबद्ध. किंमत दोन आणे. अभिप्रायः— "पुस्तक संग्राह्य आहे:" **बालांकुर.**

१३ **यमुना**:—श्लोकबद्ध. किंमत दीड आणा. अभिप्रायः— "१०४ श्लोक आहेत. छान आहेत." **बालबोध.**

१४ **शतकत्रय**:—श्लोकबद्ध. किंमत पांच आणे. अभिप्रायः— "शतकत्रयांतील कविता गोड आहे. शब्दरचना सुंदर आहे."

**मासिक मनोरंजन.**

१५ **मुलांचें प्राथमिक शिक्षण**:—किंमत साडे पांच आणे. अभिप्रायः—"यांत लहान मुलांस प्रत्येक विषयांत प्राथमिक शिक्षण कसें द्यावें, हें सांगितलें आहे. हें पुस्तक सर्व प्रकारें संग्रहणीय आहे." **शाळापत्रक.**

१६ **नशीब आणि उद्योग**:—(दुसरी आवृत्ति.) किंमत साडे पांच आणे. अभिप्राय—"रा. **लोंढे** यांची भाषा निसर्गतः सुबोध, गोड आणि साधी असून विषयवर्णन सप्रमाण व सयुक्तिक आहे. विषयविवेचन मुद्देसूद आणि मनोहर असल्यामुळें निबंध वाचनीय झाला आहे. तरुण जनांनीं अवश्य वाचावा. **काव्यसंग्रह.**

१७ **गोदावरी नाटक**:—किंमत बारा आणे. अभिप्रायः— "ह्या लहानशा नाटकांत ग्रंथकारानें सासवेचें दुःशीलत्व व सुनेचें

सुशीलत्व ह्यांचें चित्र फार नामी काढलें आहे. हें नाटक लोकाश्र-
यास पात्र अतएव संग्रहणीय आहे." **जनार्दन बाळाजी मोडक.**
हे. मा. हायस्कूल—**ठाणें.**

**१८ चारुचर्या:**—किंमत दीड आणा. श्लोकबद्ध. अभिप्राय:—
"यांत व्यवहारनीतीचीं तत्वें सोदाहरण सांगितलीं आहेत. हें छोटे-
खानी काव्य मुलांच्या हातांत देण्यास योग्य आहे.
**विविधज्ञानविस्तार.**

**१९ संसार:**—किंमत दीड आणा. श्लोकबद्ध. अभिप्राय:—
"रसाळ व बोधपर ११० श्लोकांत 'संसार' याचें चित्र रेखिलें आहे."
**सयाजीविजय.**

**२० उद्योग कसा करावा व कोणता करावा:**—किंमत
अडीच आणे. अभिप्राय:— 'प्रस्तुत पुस्तकांत प्रतिपादिलेलीं तत्वें
तरुण पिढीच्या मनांत बिंबल्यास फायदा होण्याचा संभव आहे."
**विविधज्ञानविस्तार.**

**२१ रायगड काय म्हणतो!:**—श्लोकबद्ध किंमत पांच
आणे. अभिप्राय:—"या कवितेंत प्रसाद उत्तम साधला आहे. या
कवितेंत स्थलवर्णन किंवा निसर्गवर्णन या बरोबरच ऐतिहासिक
माहिती व कवीच्या हृदयांतील कल्पनातरंग यांसही महत्व दिलें
आहे. हा प्रयत्न चांगला साधला आहे." **सुधारक.**

**२२ आईबापांचा मित्र:**— किंमत साडेसहा आणे.

---

**मे. डायरेक्टर साहेब** बहादूर इलाखा **मुंबई**—यांनीं
बक्षिसांकरितां व लायब्ऱ्यांकरितां नं. १।२।३।७।१६।१८।२०
हीं मंजूर केलीं आहेत. बक्षिसांकरितां नं. ६ हें मंजूर केलें आहे.
लायब्ऱ्यांकरितां नं. १० हें मंजूर केलें आहे.

---

**मे. डायरेक्टर साहेब** बहादूर प्रांत **वऱ्हाड** यांनीं नं. १ ते
१० व नं. १५।१६ हीं बक्षिसांकरितां मंजूर केलीं आहेत.

---

**दक्षिणाप्राइझ कमीटीनें** व **डे. व्ह. ट्रा. सोसायटीनें**
नं. १।६।७।११।१२।१३।१४।१६।१८।१९।२०।२१।२२ यांस बक्षिसें
दिलीं आहेत.

---